**अंबिकावन** सरस्वतीच्या तीरावरील अंबिकेला प्रिय असलेलें एक वन. या ठिकाणीं होणाऱ्या उत्सवाला कृष्ण, बलराम व इतर गोप यांसह नंदगोप गेला होता. [ भाग पु. १०. ३४ ]

**अंबिकाव्रत** आषाढ शु. १४ ला उपवास व पूर्णिमेस प्रातःकाळीं अंबिकेची पूजा. फल–विष्णुलोक-प्राप्ति. [ व्रतपरिचय ]

**अंबिकाहृदय** विशिष्ट मंत्रसमूह. मद्यपानाच्या पापाचें क्षालन होण्यासाठी याचा पाठ करतात. [ पु. इं. ]

**अंबिगर चौडय्य** (११६० इ. स.) कन्नड वीरशैव कवि. याचीं वचनें कर्नाटकांत फार प्रसिद्ध आहेत.

**अंबु भक्खिन** प्राचीन कालचा केवळ पाणी पिऊन राहणारा पंथ. विशेष माहिती मिळत नाही. [ स्कू. से. इन्. जै. लि.]

**अंबुवाची** सूर्य मृग नक्षत्रांत गेल्यावर पहिले तीन दिवस हा पृथ्वीच्या रजोदर्शनाचा काल मानून त्या मुदतींत जमीन नांगरणें बीं पेरणें इ. कृषिविषयक क्रिया वर्ज्य समजतात (देवी भाग. ९. १). बंगालमध्यें हा काल आषाढ वद्य दशमीपासून त्रयोदशीपर्यंत धरतात. सूर्य आर्द्रा नक्षत्राच्या प्रथम चरणांत असतो, तो काळ असाहि पर्याय आहे ( वर्ष क्रि. कौ. २८). चौथ्या दिवशीं दगडांना स्नान घालून पुष्प–माळा वाहतात व भूमाता शुद्ध झाली असें समजतात. आसामांत आषाढ महिन्याच्या शुक्ल पक्षांत कामाख्या देवीचा अंबुवाची उत्सव होत असतो. तीन दिवस देवळाचे दरवाजे बंद ठेवतात. कामाख्या ही ऋतुमती आहे अशा कल्पनेने कोणालाहि तिचें दर्शन घेऊं देत नाहीत. चौथ्या दिवशीं देवीला स्नान घालून तिथे जमलेल्या भक्तांच्या दर्शनासाठी दरवाजे उघडले जातात. या उत्सवांत देवीच्या भक्तांना देवीच्या रजोदर्शनाचें प्रतीक म्हणून लाल कापडाचे तुकडे वांटतात. या उत्सवाचा प्राचीन कृषिकर्माशीं संबंध दिसतो. मानवी स्त्रीच्या रजोदर्शनकाळांत तिला गर्भधारणा होत नाही, तिच्या ठिकाणीं टाकलेलें वीर्यरूप बीज वायां जातें, किंबहुना त्या गोष्टीचा तिला त्रास होतो, या अनुभवावरून प्राचीन मानवाने धरित्रीच्या रजोदर्शनाची कल्पना केली व तिलाहि तीन दिवस अस्पृश्य व अयोग्य मानलें. मृगाच्या पहिल्या पावसाने माती वाहून येऊन नदीनाल्यांचें पाणी लाल होतें. या दृश्यावरून पृथ्वीच्या रजःस्रावाची कल्पना प्राचीन मानवाला अधिक स्पष्ट झाली व त्याने ते तीन दिवस कृषि-कर्माला अयोग्य मानले. कामाख्या ही पृथ्वीमातेचेंच स्वरूप असल्यामुळे तिच्या या अंबुवाचीच्या काळांत विशिष्ट विधि-निषेध निर्माण केले गेले आहेत. **पाहा**–कामाख्या. [ फे. फे. आ. ]

**अंबुवासिन** पाण्यांत राहून साधना करणारा एक पंथ. विशेष माहिती मिळत नाही. [ स्कू. से. इन्. जै. लि. ]

**अंबेजोगाई** याला मोमीनाबाद असेंहि म्हणतात. मराठ–वाड्यांत हें स्थान असून इथे योगेश्वरी (जोगाई)चें सुप्रसिद्ध मंदिर आहे. योगेश्वरी ही महाराष्ट्रांतल्या अनेक घराण्यांची कुलस्वामिनी आहे. मुकुंदराज व दासोपंत या संतपुरुषांचें वास्तव्य या गावांत होतें. इथलीं रामनारायणमंदिर व संकलेश्वरमंदिर हीं जुनीं आहेत. इथे यादवकालीन कांही शिलालेख सांपडले आहेत. **पाहा** – मुकुंदराज, दासोपंत.

**अंशावतार** जगताचें संचालन करणाऱ्या परमेश्वराच्या सोळा कला मानलेल्या आहेत. जेव्हा तो सोळाहि कलांनी परिपूर्ण असा अवतार घेतो, तेव्हा त्याला पूर्णावतार म्हणतात. जेव्हा त्याच्या कला कमी असतील, तेव्हा त्याला अंशावतार म्हणतात. कृष्णावतार हा पूर्णावतार मानलेला आहे. **पाहा** – अवतार.

**अंशुक** प्राचीन काळचें एक वस्त्र. बृहत्कल्पसूत्रभाष्याच्या टीकेंत याला कोमल व चमकदार रेशमी कापड असें म्हटलें आहे. यांत जरतारी कामहि करीत. बाणाने (हर्षचरित) याला अत्यंत तलम व स्वच्छ वस्त्र असें म्हटलें आहे. अंशुक फुलें आणि पक्षी यांच्या आकृतींनी सुशोभित केलें जातें, असेंहि तो म्हणतो. त्याच्या तलम या विशेषणावरून कांही संशोधक ती मलमल असावी असें म्हणतात. पण मलमल सुती असते. अंशुक हें रेशमी वस्त्र असल्याचे पुरावे मिळतात. जैनांच्या अनु-योगद्वारसूत्रांत कीटज (रेशमी) वस्त्राचे पांच प्रकार मानले आहेत, त्यांत अंशुकाचें नांव आहे. अंशुकाचे प्रकार दोन–एक भारतीय व दुसरें चीनमधून येणारें. या दुसऱ्याला चीनांशुक असें नांव होतें. बृहत्कल्पसूत्रभाष्यांत याची व्याख्या दिली आहे ती अशी– 'चीनो नाम जनपदः तस्य यः श्लक्षणतरः पटः तस्माज्जातम्' (= चीनमधल्या तलम रेशमी कापडापासून बनवलेलें वस्त्र) कालिदासाने याचा शाकुंतलांत उल्लेख केला

आहे –‘चीनांशुकमिव केतोः प्रतिवातं नीयमानस्य’ [ हर्ष चरित; प्रा. भा. वे. ]

**अंशुमती** एक नदी. ऋग्वेदांत हिचा नामोल्लेख आहे (८. ९५. १४). हिच्या तीरीं कृष्ण नांवाचा असुर राहत होता. इंद्राने त्याला मारलें (ऋ. ८. ९५. १५). ही नदी कुरुप्रदेशांत यमुनेच्या जवळ असल्याचें वाल्मीकीनें सांगितलें आहे (वारा. २. ५५. ६).

**अंशुवर्धन** (इ. स. ७ वें शतक) नेपाळच्या ठाकुरी वंशांतला पहिला राजा. हा प्रथम हर्षाचा मांडलिक होता. त्याच्या पश्चात् स्वतंत्र झाला. याने शब्दविद्याशास्त्र नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. [ सु. वि. को. ]

**अ** याचे पुढील अर्थ सांगितलेले आहेत--(१) आदिवर्ण. ‘अक्षराणामकारोऽस्मि’--अक्षरांतला अकार मी आहें (गीता १०.३३). वाङमयाचें आदि बीज. (२) प्रणवाची पहिली मात्रा. (३) नञर्थक--नेति नेति-सूचक. (४) शिव, ब्रह्मा, वायु व वैश्वानर.

**अः शिखायां सिद्धमन्त्रे प्रग्राहेऽर्के रथार्वणि ।**
**चक्रे कुक्कुटमूर्ध्नीन्दुबिम्बे ब्रह्मेशविष्णुषु ॥**
( नानार्थमंजिरी )

अर्थ--ज्वाला, मंत्र, पर्जन्य, रथाचा घोडा, चक्र, कोंबडचाचें डोकें, चंद्रबिंब, ब्रह्मा, शिव, विष्णु हे अ चे अर्थ होत.

अ हें समस्त भाषांच्या वर्णमालेंतलें पहिलें अक्षर असून पाणिनीने त्याचें स्थान कंठ हें मानलेलें आहे (अकुहविसर्जनीयानां कण्ठः). वेगवेगळचा उच्चारणांनुसार याचे सानुनासिक व निरनुनासिक असे १८ भेद होतात. अ च्या रचनेबाबत

| ३ शती ई०पू० | १श०प० | १-२श०प० | २-३श०प० |
|---|---|---|---|
| मौर्य | शक | आंध्र | कुषण |
| २-३श०प० | ४श०प० | ६श०प० | ७-९ श० |
| जग्गयपेट | आदि गुप्त | उत्तर गुप्त | मध्ययुग |

( हिंदी विश्वकोश )

वर्णोद्धारतंत्रांत पुढील उल्लेख आहे– एक उभी रेषा असून तिला दोन आडव्या रेषा फुटतात. एक वांकून वर जाते व दुसरी वांकून खालीं येते. सनपूर्व ४ थ्या शतकांतल्या ब्राह्मी लिपीपासून आजच्या देवनागरी लिपीपर्यंत वेगवेगळचा शतकांत अ चीं मागील रूपें दृग्गोचर होतात--

तंत्रशास्त्रानुसार अ मध्यें ब्रह्मा, विष्णु, शिव व त्यांच्या शक्ती वर्तमान आहेत. अ + उ + म् मिळून ओंकार बनतो. त्याचें प्रथम बीज अ हें आहे. चित्ताच्या एकाग्रतेसाठीं प्रथम त्याचाच जप केला जातो.

**अकडा** मुंडा खेडचांतलें नृत्याचें सामुदायिक आंगण. हें खेडचाच्या मध्यभागीं किंवा बाहेर असतें. तें नेहमी स्वच्छ ठेवतात. अविवाहित मुलें व मुली त्यांत नृत्य करतात. मुंडा लोक आपल्या मुलांसाठी क्रीडांगणें व तरुण-तरुणींसाठी नृत्यांगणें निर्माण करून त्यांच्या नैसर्गिक आकांक्षांना अवकाश देतात. मुंडा नृत्यांगण ही एक सार्वजनिक संस्थाच असते. या संस्थेवर त्यांचीं नियंत्रणेंहि असतात. वडीलधारीं माणसें तिथल्या नृत्यावर देखरेख ठेवतात. हेतु हा, की नृत्य करणाऱ्या तरुण स्त्री-पुरुषांनी उच्छृंखल वर्तन करूं नये. नृत्याच्या कार्यक्रमाची वेळ मर्यादित असते. नृत्यें रात्रीच्या वेळीं होतात व मध्यरात्रीपर्यंतच संपतात. म्हणजे जागरणावर निर्बंध असतो. नृत्याचीं गाणीं अश्लील नसावीं याबद्दल दक्षता घेतात. कोणी अश्लील गाणें म्हणूं लागला, तर लगेच नृत्य बंद करतात व दुसऱ्या दिवशीं पंचायत भरवून त्या माणसाला दंड करतात. [एन्सा. मुं.]

**अकथादि त्रिरेखा** तीन वर्णरेखांनी बनलेला त्रिकोण. अकारादि सोळा स्वरांनी बनलेली वामा रेखा, ककारादि सोळा वर्णांनी बनलेली ज्येष्ठा रेखा व थकारादि सोळा वर्णांची बनलेली रौद्री रेखा, या तीन रेषांचा त्रिकोण बनतो त्याला हें नांव आहे. **पाहा**–कामकला. [ स. पॉ. ]

**अकबर** ( १५४२-१६०५ इ. स. ) मोगल बादशाहा हुमायूं याचा पुत्र. संपूर्ण नांव जलालुद्दीन मुहम्मद अकबर. याचा जन्म अमरकोट ( सिंध )च्या किल्ल्यांत झाला. त्याच्या जन्माच्या वेळी हुमायूं वनवासी झाला होता. त्याने पुढचीं दहा बारा वर्षें अफगाणिस्तान व इराण या देशांत घालवलीं. तो काळ फार धामधुमीचा होता. हुमायूं अकबराला कंदाहारपर्यंत घेऊन गेला; पण पुढे त्याला आपल्या मुलाला कंदाहारमध्येंच सोडून इराणांत पळून जावें लागलें. त्या काळांत अकबराचें संगोपन व संरक्षण त्याच्या चुलत्याने केलें. काही कालाने हुमायूंनें इराणांतून परत येऊन काबूल व कंदाहार जिंकून घेतलें. त्या

वेळीं अकबर तीन वर्षांचा होता. इ. स १५५५ मध्ये हुमायूंने परत भारतावर आक्रमण केलें व दिल्लीचें तख्त जिंकून घेतलें. १५५६ मध्यें हुमायूं मरण पावला. त्या वेळीं अकबर चौदा वर्षांचा होता.बहरामखान नांवाचा एक शूर सरदार अकबराचा गुरु होता. हूमायूंच्या मृत्यूनंतर त्यानें अकबराला दिल्लीच्या गादीवर बसवलें व तो अकबराचा प्रतिनिधि म्हणून राज्यकारभार पाहूं लागला.


अकबर

सर्व बाळपण धामधुमींत गेल्यामुळे अकबराचें शिक्षण नीटपणे झालें नाही. लेखन-वाचनांत त्याचें मन रमतहि नसे. मात्र त्याची स्मरणशक्ति तीव्र व बुद्धि कुशाग्र होती. त्यामुळे त्याने अवांतर ज्ञान पुष्कळच मिळवलें होतें. घोड्यावर बसणें, तलवार चालविणें, निशाण मारणें या गोष्टींतहि तो तरबेज होता. अकबर दिल्लीचा बादशहा झाला, त्या वेळीं दिल्ली आग्रा व पंजाब एवढाच मुलूख त्याच्या ताब्यांत होता व सर्व बाजूंनी शत्रू त्याच्याविरुद्ध उठले होते. पंजाबांत सिकंदरशहा सूर, पूर्वेकडे महमदशहा आदिली, मध्यप्रदेशांत व राजस्थानांत हिंदू राजे, तसेच जुने पठाण सरदार व अफगाणिस्तानांतले अम्मलदार या सर्वांनी अकबराशीं झुंज घेण्याची तयारी चालवली होती. जरी बहरामखान राज्य चालवीत होता, तरी अकबरहि त्यांत लक्ष घालीत होता. त्याने प्रथम पंजाबांतल्या सिकंदरशहा सूरवर चढाई केली व त्याला मागे रेटीत रेटीत शिवालिक पर्वतांतल्या माणकोट येथील किल्ल्याचा आश्रय घ्यायला लावलें. याप्रमाणे अकबर पंजाबांत गुंतला असतां इकडे सिकंदरशहाचा सेनापति हिमू (हेमराज) याने दिल्लीवर चढाई केली. त्यामुळे हातीं घेतलेल्या मोहिमेवरून परत येतांच अकबराला हिमूविरुद्ध लढाई द्यावी लागली. पानिपतच्या मैदानावर तो रणसंग्राम झाला आणि त्यांत बहरामखानाने हिमूचा शिरच्छेद केल्यावर ती लढाई संपली.

राज्यारूढ झाल्यानंतर चार पांच वर्षांतच अकबराने राज्ययंत्र सर्वस्वीं आपल्या ताब्यांत घेतलें. बहरामखानाला ती गोष्ट लागली आणि त्याने अकबराविरुद्ध बंड उभारलें; पण थोड्याच काळांत अकबराने बहरामखानाला कैद करून त्याचें बंड मोडून काढलें. अकबराने तशाहि स्थितींत बहरामखानाला सन्मानाने वागवलें. पण बहरामखान त्याच्याराज्यांत न राहतां मक्केला निघून गेला.

इ. स. १५६० पासून तों १५६७ पर्यंतच्या सात आठ वर्षांपर्यंतचा अकबराचा काळ मुख्यत्वें बंडें मोडण्यांतच खर्च झाला. तेवढ्या कालांत त्याने आपलें राज्य बरेंच सुस्थिरहि केलें. १५६४ पर्यंत अकबराचें सैन्य माळवा जिंकून राजस्थानांत जोधपूरपर्यंत पोंचलें होतें. राजस्थान अकबराच्या विरुद्ध धुमसूं लागला होता. पण राजपूत राजांना जिंकून केवळ आपलें साम्राज्य वाढविणें, एवढाच अकबराचा उद्देश नव्हता; तर त्या राजांशीं मैत्री करून त्यांना आपल्या साम्राज्याचे हितचिंतक बनवावें, अशीहि त्याची आकांक्षा होती. म्हणून त्याने राजपूत राजांना अभिवचन दिलें, की 'तुम्ही जर माझें प्रभुत्व मान्य करून मला सैनिकी सहकार्य द्याल, आपसांतल्या लढाया थांबवाल आणि माझ्या आज्ञेनेच राज्यगादीवर बसाल, तर मी तुमच्या धर्मांत, कारभारांत आणि सामाजिक जीवनांत हस्तक्षेप करणार नाही.'

त्याप्रमाणे जयपूर व जोधपूर येथील राजपूत राजांनी अकबराच्या शर्ती मानल्या. त्यांनी अकबराशीं मैत्री तर केलीच; शिवाय, त्याला आपल्या घराण्यांतल्या मुली देऊन त्याच्याशीं वैवाहिक संबंधहि प्रस्थापित केले. पण राजस्थानांतला कोणता एक संस्थानिक अकबराच्या आमिषाला भुलला नसेल, तर तो मेवाडचा राणा प्रतापसिंह हा होय. तो अकबराविरुद्ध दंड थोपटून उभा राहिला. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी अकबराने मानसिंहाला सैन्यासह तिकडे पाठवलें. हळदीघाटांत मानसिंह व राणा प्रताप यांचें घनघोर युद्ध झालें आणि त्या युद्धांत प्रतापसिंहाचा पाडाव झाला. त्यामुळे १५७६ मध्ये मेवाडहि अकबराच्या साम्राज्यांत समाविष्ट झालें. त्याआधी त्याने गुजरात, बंगाल व बिहार हे प्रांतहि आपल्या सत्तेखालीं आणले होते. अशा रीतीने १५-२० वर्षांच्या कारकीर्दीत अकबराने काबूलपासून आसामपर्यंत व पश्चिमेस गुजरातपर्यंत आपली सत्ता भारतांत प्रस्थापित केली.

अकबराच्या राज्यविस्ताराचा तक्ता पुढीलप्रमाणे –

| | | |
|---|---|---|
| १५५६ | इ. स. | राज्यप्राप्ति. |
| १५५७ | ,, | पंजाबवर स्वारी. सिकंदरशहा शरण आला. |
| १५६० | ,, | बहरामखानाचें बंड मोडून काढलें. |
| १५६२ | ,, | माळवा जिंकला. |
| १५६४ | ,, | चुन्नार घेतलें. |

१५६५ इ. स. आग्रा येथील किल्ला बांधण्यास प्रारंभ.
१५६८ ,, चितोड हस्तगत केलें.
१५७२ ,, गुजरातवर मोहीम.
१५७५ ,, बंगाल व बिहार सत्तेखाली आणला.
१५७६ ,, मेवाडच्या राणा प्रतापसिंहाविरुद्ध मोहीम.
१५७७ ,, उडीसांतलें दाऊदखानाचें बंड मोडलें.
१५८२ ,, बंधु हकीम याचा पराभव.
१५८७ ,, काश्मीर जिंकलें.
१५८८ ,, सिंध प्रांत आपल्या राज्याला जोडला.
१५९४ ,, कंदाहार काबीज केलें.
१५९६ ,, अहमदनगरवर स्वारी. वऱ्हाड घेतला.
१६०० ,, अहमदनगर घेतलें.

एक उत्तम शासनकर्ता म्हणून अकबर बादशाहा प्रसिद्ध आहे. प्रजेचें हित हेंच त्याचें ध्येय होतें. त्याने सर्व साम्राज्याचे १५ विभाग पाडून सर्वत्र समान राज्यव्यवस्था सुरू केली. शेतीस उत्तेजन देणें, वसुलाची व्यवस्था चांगली ठेवणें आणि काटकसरीने खर्च करणें, हे त्याच्या राज्यव्यवस्थेतील विशेष गुण होते, असें अबुल फज़ल याने म्हटलें आहे.

लोकांची आर्थिक, सामाजिक व धार्मिक उन्नति व्हावी म्हणून अकबराने अनेक कायदे केले. त्यांची अंमलबजावणी नीट व्हावी म्हणून अधिकारीहि नेमले. तो जितका कठोर तितकाच दयाळूहि होता. राज्यकारभारांत तो फार दक्ष असून दिवसांतील १५-१६ तास त्या कामीं खर्च करीत असे.

समाजसुधारणेच्या दृष्टीने त्याने व्यभिचार व मद्यपानाचा अतिरेक हे गुन्हे ठरवून त्यांसाठीं कडक शिक्षा ठेवली. त्या काळीं लढाईंत पकडलेल्या सैनिकांना गुलाम करण्याची चाल होती, ती त्याने बंद केली. तो वृत्तीने धार्मिक असूनहि त्याच्याजवळ कट्टरपणा नव्हता. त्याचे धार्मिक विचार उदार असून अंतःकरण विशाल होतें. सर्व धर्मांच्या अनुयायांना समानतेनें वागविण्याचें धोरण त्याने अवलंबिलें होतें. १५६३ पर्यंत हिंदु यात्रेकरूंकडून तीर्थस्थानांच्या ठिकाणीं यात्राकर वसूल केला जात असे; तो त्याने रद्द केला. त्याचप्रमाणे १५८१ मध्ये त्याने जिजिया करहि रद्द केला.

अकबराला सर्व धर्मांतल्या श्रेष्ठ तत्त्वांविषयीं आदर वाटत असे आणि त्यांचें ज्ञान मिळावें या हेतूने तो प्रत्येक धर्माच्या पंडितांना बोलावून त्यांच्याशीं धर्मचर्चा करी. तो हिंदुत्व व इस्लाम या दोहोंचाहि प्रेमी होता; पण दोन्ही धर्मांतल्या कट्टरपणाची त्याला घृणा होती. धर्मांतर करणाऱ्या लोकांकडे तो तुच्छ नजरेनेच पाही. कारण त्याला वाटे, की जे लोक भीति किंवा लोभ या कारणांनी धर्म बदलतात, ते खरेखुरे धार्मिकच नव्हेत.

धर्म हा अकबराच्या बाबतींत राजनीतीचें साधन नव्हता, तर ती त्याच्या आत्म्याची अनुभवविषयक जिज्ञासा होती. अबुल फज़ल व बदायूनी यांच्या ग्रंथांवरून कळतें, की अकबर सूफी साधूंप्रमाणे कधी कधी समाधि लावून बसत होता. त्या समाधींत तो अंतिम सत्याच्या पुष्कळसा जवळ जात होता, असेंहि लिहिलेलें आहे.

मुसलमान असल्यामुळे त्याला असेंहि वाटे, की आपण इस्लामच्या तत्त्वांप्रमाणे चालावें. पण त्याच्या काळापर्यंत इस्लाम धर्मांत अनेक पंथोपपंथ निर्माण झाले होते. त्यांत कोण खरा आणि कोण खोटा हें इस्लामी धर्मपंडितांच्या वादविवादांतून समजून घ्यावें, म्हणून तो प्रयत्न करी. त्यानें फत्तेहपूर सिकरी येथें त्यासाठी एक इबादतखाना (प्रार्थनागृह) बनविला होता. तिथे तो अनेक प्रसंगीं धार्मिक वादविवाद घडवून आणी. त्या वादसभेचा अध्यक्ष तो स्वतः राही. कित्येक वेळां अन्यधर्मीय, विशेषतः हिंदु पंडितांनाहि इस्लामी पंडितांशीं पूर्वोत्तर पक्ष करायला लावी व त्या वादाचा अंतिम निर्णय आपण देई. अशा प्रकारें स्वतःचें श्रेष्ठत्व इतरांना स्वीकारायला लावून अकबर देशाचा धार्मिक नेताहि बनूं लागला. इ. स. १५७९ मध्ये अकबर साम्राज्याचा प्रमुख इमाम या अधिकाराने मशिदींत खुतबा पढला. त्या वेळीं राज्यांतल्या प्रमुख उलेमांच्या सह्यांनिशीं अशी घोषणा केली गेली, की 'इमाम-ए-आदिल (प्रमुख इमाम अर्थात् अकबर) सर्व धर्मपंडितांत श्रेष्ठ आहे व वादग्रस्त मामल्यांत त्याचा फैसला सर्वांनी मान्य केला पाहिजे. जो न मानील तो दंडनीय ठरेल.'

त्याच्या या घोषणेने कट्टर मुसलमान भडकून उठले व त्यांनी अकबराचा भाऊ महम्मद हकीम याला मिळून बिहार व बंगाल या प्रदेशांत बंड उभारलें. पण अकबर तें मोडून काढण्याच्या कामीं समर्थ ठरला आणि त्यामुळे धर्माच्या बाबतींत अंतिम निर्णय देण्याचें त्याला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें.

सर्व धर्मांचा समन्वय करून एक व्यापक धर्म निर्माण करण्याची त्याला तळमळ लागली होती. त्यांतूनच त्याचा दीने इलाही हा नवा धर्मपंथ निर्माण झाला. दीने-इ-लाही याचा अर्थ ईश्वरी धर्म असा होतो. त्याला तौहीदे इलाही (एकेश्वरी धर्म) असेंहि म्हणतात.

(१) ईश्वरावर दृढ श्रद्धा असणें (२) अकबर हा ईश्वराचा बारावा इमाम आहे, या कल्पनेवर विश्वास ठेवणें (३) हत्या व मांसभोजन यांचा त्याग (४) स्त्रीसहवासांत संयम व शुचिता आणि (५) वेळोवेळीं भोजन व दान देणें हीं या पंथाचीं मुख्य तत्त्वें होतीं. अबुल फज़ल हा त्या धर्माचा मुख्य आचार्य होता खरा; पण अकबर स्वतःच लोकांना

त्या पंथाची दीक्षा देत असे. दीक्षित मनुष्य अकबराचें एक चित्र स्वतःच्या पगडींत ठेवी. त्यावर अल्ला हु अकबर हे शब्द लिहिलेले असत. या पंथांतलीं दोन माणसें भेटलीं, की अल्ला हु अकबर व जल्ले जलाल हु, या घोषणांनी परस्परांना अभिवादन करीत.

इ. स. १५९३ मध्ये त्याने धार्मिक स्वातंत्र्याबाबत कित्येक फर्मानें काढलीं. त्यांत पुढील आज्ञा महत्त्वाच्या होत्या— (१) जबरदस्तीने बाटविला गेलेला हिंदु जर पुनश्च स्वधर्मांत जाऊं इच्छीत असेल तर त्याला कोणीहि अडवूं नये. (२) कोणत्याहि माणसाला धाकदपटशाने धर्मांतर करायला लावूं नये. (३) प्रत्येक व्यक्तीला आपलें धर्ममंदिर बनविण्याची पूर्ण स्वतंत्रता आहे. (४) विधवेला सक्तीने सती जायला लावूं नये. लहानपणापासून हिंदूंशीं घनिष्ठ संबंध आल्यामुळे त्यांच्या आचारविचारांचें त्याला चांगलेंच ज्ञान झालें होतें. हिंदुधर्मांतील पुनर्जन्म, कर्मवाद, इ. अनेक सिद्धान्त त्याला मान्य होते. रक्षाबंधन, दसरा, दिवाळी, वसंतपंचमी, इ. हिंदुसण व उत्सव तो मोठ्या समारंभाने करी. हिंदूंप्रमाणे तो कपाळीं टिळा लावी व डोक्याला साफाहि बांधी.

अकबराने आपल्या जीवनांत धार्मिक समन्वयाला मोठेंच स्थान दिलें होतें. जें चांगलें वाटलें, मनाला भावलें, तें तत्त्व व उपास्य त्याने आपल्या आचरणांत आणलें होतें. त्याने पारशी धर्मांतील अग्नीची उपासनाहि सुरू केली होती. नवरोजसारखे कांही पारशी सणहि तो साजरे करी. तो सूर्याचीहि उपासना करी. जैन धर्माचाहि त्याच्यावर प्रभाव पडला होता. पण या सर्वांत त्याच्यावर विशेष प्रभाव होता तो हिंदुधर्माचा.

दीने इलाहीच्या स्थापनेनंतर अकबराने दरबारांतले मुसलमानी सण बंद केले, मशिदी बंद केल्या व गोमांसभक्षणासहि बंदी केली. परंतु धर्मसंस्थापकास आवश्यक असणारी कट्टरता त्याच्या अंगीं नव्हती. धर्मप्रसारासाठी आवश्यक तो दीर्घोद्योगहि त्याच्या हातून झाला नाही. त्यामुळे त्याचा दीने इलाही पंथ प्रसार पावला नाही. त्याला सुमारे एक हजारच अनुयायी मिळाले. बिरबलाशिवाय कोणीहि प्रतिष्ठित हिंदु त्यांत सामील झाला नाही. साम्राज्याच्या स्थिरतेसाठी मुस्लीम धर्म अयोग्य म्हणून अकबराने त्याचा त्याग केला; पण तें स्थान त्याच्या नवीन धर्माला मिळूं शकलें नाही. त्याची सहिष्णु वृत्ति व अनाग्रही बुद्धि यांमुळेच त्या नवीन धर्माचीं पाळेंमुळें त्याच्या साम्राज्यांत खोलवर गेलीं नाहीत. अकबराबरोबरच त्याचा तो धर्म लयाला गेला.



अकबराच्या कारकीर्दींत साहित्य, संगीत व कला यांचा खूप उत्कर्ष झाला. त्याने अनेक पंडितांना व कलावंतांना आपल्या दरबारांत आश्रय दिला होता. अबुल फज़ल, फैझी, बदायूनी, बिरबल, तोडरमल, मानसिंग, तानसेन, हीं त्याच्या नवरत्नांपैकी कांही रत्नें सुविख्यात आहेत. त्यांच्यामुळे त्याच्या कारकीर्दींत विद्वत्ता व कलाकौशल्य या गुणांची चांगलीच जोपासना झाली. त्याने फारसी व संस्कृत साहित्याच्या निर्मितीलाहि खूपच उत्तेजन दिलें. अथर्ववेद, भगवद्‌गीता, रामायण, महाभारत, हरिवंश, लीलावती, पंचतंत्र, नल-दमयन्ती आख्यान, योगवासिष्ठ, राजतरंगिणी, इ. संस्कृत ग्रंथांचें त्याने विद्वानांकडून फारसी भाषेंत भाषांतर करवून घेतलें. त्याच्या काळांत लिहिलेले अनेक फारसी इतिहासहि उपलब्ध आहेत. अकबराची राजवट म्हणजे हिंदी काव्य-रचनेचें सुवर्णयुगच मानलें जातें. तुलसीदास, सूरदास, रहीम, रसखान, बिरबल, हे श्रेष्ठ कवी त्याच्याच काळांत होऊन गेले. चित्रकला, शिल्पकला, इ. कलांचाहि त्या काळांत बराच उत्कर्ष झाला. अकबराला संगीताची फार आवड होती. तो उत्तम संगीतज्ञहि होता. तानसेनासारख्या अलौकिक गायकाला राजाश्रय देऊन त्याने आपलें नांव संगीताच्या क्षेत्रांत अमर केलें. हिंदु व मुसलमानी संगीताचें मिश्रण करून एक निराळेंच हिंदुस्थानी संगीत निर्माण करायला अकबरानेच प्रेरणा दिली.

अकबराची राहणी अगदी साधी असून तो फार संयमी होता. त्याची बुद्धि शोधक होती. त्याला यांत्रिक प्रयोगांचीहि आवड होती. तो उद्योगप्रिय होता. त्याचा बांधा मध्यम आकाराचा; पण सुडौल होता. त्याचा रंग गव्हाळी असून डोळे काळे होते. त्याची वाणी स्पष्ट व भारदस्त होती. तो शूर होता, तसाच कुशल सेनानीहि होता.

अकबराचीं शेवटचीं चार पांच वर्षें फार दुःखांत गेलीं. त्याचा मोठा मुलगा सलीम बापाविरुद्ध उठला. त्याचे दुसरे दोन मुलगे मुराद व दानियल हे दारूच्या व्यसनापायीं मेले. अकबराचा जिवलग मित्र व कारभारी, अबुल फज़ल याचा जहांगिराने खून करविला. या सर्व घटना अकबराला अखेरच्या काळांत अत्यंत असह्य ठरल्या. अशा भग्न व अशरण अवस्थेंत १५ ऑक्टोबर १६०५ रोजीं त्याला मृत्यु आला. जगांत जे अनेक थोर सम्राट् होऊन गेले, त्यांत अकबराची गणना होते. अकबराने पाजळलेली हिंदु–मुस्लिम धर्मांच्या समन्वयाची ज्योत पुढच्या मोगल बादशहांनी विझवली नसती, तर भारताच्या इतिहासाला वेगळें आणि चांगलें वळण लागलें असतें. [ मु. का. भा; हिं. वि. को; म. ज्ञा. को. ]

## अकबरी कालिदास

(१७ वें शतक) मूळ नांव गोविंद-भट्ट. हा अकबराच्या दरबारांत होता. मुस्लिम राजवटींत ज्या संस्कृत पंडितांना उदार राजाश्रय मिळाला, अशा पंडितांपैकी गोविंदभट्ट हा एक होता. तिथेच त्याला अकबरी कालिदास ही पदवी मिळाली. आपल्या काव्यांतून त्याने या पदवीचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. मात्र याचें काव्य एकत्रित मिळत नसून तें स्फुट स्वरूपांत आढळतें. बांधव सम्राट् रामचंद्र महाराज याचाहि याला आश्रय होता. याने त्या राजाच्या स्तुतिपर लिहिलेला प्रबंध उपलब्ध असून त्याचें नांव रामचंद्र यशःप्रबंध असें आहे. हा सतराव्या शतकांतला श्रेष्ठ साहित्यकार होता. स्वतःच्या प्रतिभेबद्दल तो अभिमानाने लिहितो—

**अनाराध्य कालीमनास्वाद्य गौरी–**
**मृते मन्त्रतन्त्राद्विना शब्दचौर्यात् ।**
**प्रबन्धं प्रगल्भं प्रकर्तुं प्रवक्तुं**
**विरिञ्चिप्रपञ्चे मदन्यः कविः कः ।।**

(पद्यवेणी ७८६)

अर्थ—कालीची आराधना, गौरीचें आस्वादन, मंत्रतंत्र व शब्दचौर्य या गोष्टी केल्यावांचून प्रगल्भ प्रबंध निर्माण करणें व प्रवचन करणें या कामीं ब्रह्मदेवाच्या सृष्टींत माझ्याहून दुसरा कोणी कवि सांपडणार नाही.

या श्लोकाला कालिदासाच्या अधिक्षेपाचा सूक्ष्म वास येतो.

## अकरमासे

अकरमासे म्हणजे पूर्ण बारा मासे नव्हेत असे, म्हणजेच ज्यांच्यांत कांही न्यूनत्व आहे असे लोक. पूर्वीं श्रीमंत मराठे लग्नप्रसंगीं आपल्या जावयाला एखादी सुंदर स्त्री आंदण म्हणून देत. अशा स्त्रियांच्या संततीला पुढे अकरमासे म्हणू लागले. ही जात ठाणें व पश्चिम खानदेश या जिल्ह्यांत आढळते. यांना कडू, शितळे, लेकावळे अशींहि नांवें आहेत. यांच्यांतहि अस्सल व कमअस्सल असे दोन वर्ग आहेत. मराठा स्त्रीला ब्राह्मण व मराठा पुरुषापासून झालेली संतति ती अस्सल व खालच्या दर्ज्याच्या पुरुषापासून झालेली ती कम-अस्सल. सध्या यांचे व्यवसाय दुकानदारी, शेती, सुतारकी, लोहारकी वगैरे आहेत. हे मराठी बोलतात. यांची राहणी स्वच्छ आणि डामडौली असते. पेहेराव मराठी धर्तीचा असतो. मद्यमांस सेवन करतात. यांच्यांत स्मार्त-भागवत असे दोन्ही पंथ आहेत. हे ब्राह्मण उपाध्यायांकडून धर्मकृत्यें करतात. जातिसभा असते ती तंट्यांचा निवाडा करते. यांना विधवाविवाह संमत आहे. मृतांना जाळतात किंवा पुरतात. [ म. ज्ञा. को. ]

**अकरा नरक** तामिस्र, अंधतामिस्र, रौरव, महारौरव, संदंश, कुंभीपाक, कालसूत्र, सप्तसूर्मि, वैतरणी, वज्रकंटक व असिपत्र. या नांवांबद्दल एकवाक्यता नाही.

**अकरावा** मृताच्या अकराव्या दिवशीं दानें व वृषोत्सर्गादि, विधि करतात, त्यांना हें नांव आहे. **पाहा–** अंत्यसंस्कार.

**अकरें** देवापुढे लावण्याच्या ११ वाती किंवा ११ पिठाचे दिवे. अकरें हें चढत्या व उतरत्या क्रमाने देवापुढे लावतात.

**अकलंकदेव** ( ७ वें शतक ) दिगंबरपंथीय जैन आचार्य, याला कवि अशी पदवी होती. हा मोठा विद्वान् व महातार्किक होता. याने अनेक बौद्धपंडितांशीं वादविवाद करून बौद्धधर्माच्या प्रभावापासून दक्षिण भारतांतील जैन दर्शनाचें संरक्षण केलें. याने जैन तर्कशास्त्रांत मोलाची भर घातली आहे. गृध्रपिच्छविरचित तत्त्वार्थसूत्रांवर तत्त्वार्थ वार्तिक हा ग्रंथ लिहून याने जैन सिद्धांतावरील त्रिविध आक्षेपांचें निराकरण केलें. समंतभद्रकृत आप्तमीमांसा या ग्रंथावर याचें अष्टशती नांवाचें स्वल्पाक्षर; पण अर्थगंभीर असें भाष्य आहे. त्यांत जैनांच्या स्याद्वादाचें प्रभावी समर्थन आढळतें. प्रमाणसंग्रह, न्यायविनिश्चय, सिद्धिविनिश्चय व लघीयस्त्रय हे चार प्रकरणग्रंथ लिहून याने जैन प्रमाणशास्त्राची व्यवस्थित पुनर्रचना केली.

तत्त्वज्ञानाच्या सर्वंकष अभ्यासाला प्रोत्साहन देणें हें अकलंकदेवाचें दुसरें महत्कार्य. सिद्धिविनिश्चय या ग्रंथांत त्याने निरनिराळ्या सोळा विषयांचा जो ऊहापोह केला आहे, त्यावरून हें स्पष्ट होतें. आपल्या वेळीं उपलब्ध व प्रचलित असलेल्या सर्व तत्त्वज्ञानप्रवाहांचा अभ्यास करून त्यांवर ज्ञानकोशाच्या स्वरूपाचे व्यापक ग्रंथ लिहिण्याची जी प्रथा पुढे वाचस्पतिमिश्र, उदयन, शांतरक्षित, इ. प्रायः सर्व दर्शनकारांनी चालू केली, तिचा प्रारंभ अकलंकदेवाच्या ग्रंथांपासून झाला आहे, असें म्हणतां येतें. याचा धर्मकीर्तीबरोबर निर्देश केला जातो. याने कांची येथील हिमशीतल राजाच्या दरबारांत बौद्धांचा पराभव केला आणि त्यामुळे दक्षिणेंतून बौद्धांची हकालपट्टी झाली, असें रामस्वामी अय्यंगार लिहितात.

अकलंक हा तार्किक असला, तरी त्याचें अंतःकरण भक्ताचें होतें, हें त्याच्या अकलंकस्तोत्रावरून कळून येतें. तो म्हणतो–

त्रैलोक्यं सकलं त्रिकालविषयं सालोकमालोकितं
साक्षाद्येन यथा स्वयं करतले रेखात्रयं साङ्गुलि ।
रागद्वेषभयामयान्तकजरालोलत्वलोभादयो
नालं यत्पदलङ्घनाय स महादेवो मया वन्द्यते ।।

अर्थ — ज्याने त्रिकालविषय असें सकल त्रैलोक्य हाताचीं बोटें आणि त्यांवरील रेषा यांच्याप्रमाणे साक्षात् अवलोकन केलें आहे व राग, द्वेष, भय, रोग, मृत्यु, जरा, चंचलता, लोभ, इत्यादि विकार ज्याच्या पदाचें उल्लंघन करायला असमर्थ आहेत, अशा त्या महादेवाला (महावीर ?) मी वंदन करतों. [ नवभारत; म. च. को. ]

**अका** भारताच्या ईशान्य प्रदेशांतील ( N. E. F. A. ) डोंगरांत राहणारी एक पहाडी जमात. भोरोली नदीच्या कांठीं यांची वस्ती आहे. लोक त्यांना अका म्हणत असले, तरी ते स्वतःला 'ऱ्हुसो' म्हणवितात. यांच्या दोन टोळ्या आहेत. (१) हजारीखावा अर्थात हजार चुलींवरचें खाणारे व (२) कापाचोर अर्थात् कापसाच्या झाडांत दडून बसणारे (चोर). अका हे मुळापासून बंडखोर वृत्तीचे आहेत. यांची लोकसंख्या अत्यल्प आहे. इतिहासकाळांत हे खाली आसामांत उतरून दंगल करीत व लोकांना लुबाडीत. त्यांचा बंदोबस्त करणें अशक्य ठरल्यावरून आसाममधील राजांनी त्यांना 'पोजा' चा अधिकार दिला होता. पोजा याचा अर्थ धाकदपटशा असा होतो. त्या हक्कानुसार आसामी राजे त्यांना आपल्या खंडणींतला कांही वांटा देत. १८२५ च्या सरकारी दप्तरखान्यांतील माहितीवरून असें कळतें, की हजारीखावा हे आपापल्या नेमून घेतलेल्या प्रदेशांत घरोघरीं जाऊन स्वतःच खंडणी वसूल करीत.

आसामांत ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यावर ब्रिटिशांना अका जमातीने लोकांकडून खंडणी वसूल करणें ही गोष्ट पसंत पडली नाही. त्यासाठी ब्रिटिश सरकार आपल्या तिजोरींतून त्यांना खंडणी देऊं लागलें.

कापाचोरांचा तंगी नांवाचा एक पुढारी होता. त्याने आपल्या भोवतालच्या प्रदेशांत दहशतीचें राज्य सुरू केलें. आसामचें सरकार त्याच्या पाठीमागे लागलें. पुढे ब्रिटिशांनी आसाम घेतल्यावर तेहि त्याचा पिच्छा पुरवूं लागले. पुढें हळूहळू कापाचोर व हजारीखावा यांच्यांत अंतर्गत भांडणें सुरू करून भेदनीतीच्या बळावर ब्रिटिशांनी तंगीला पकडलें. त्याला गौहाटीच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें होतें; पण तिथूनहि तो निसटला. पुढे १८४१ पर्यंत त्याने खून, लूटमार व पळवापळवी यांचें जणू सत्रच चालू केलें. त्याला आणि

त्याच्या टोळीला शरण आणण्यासाठी ब्रिटिश सरकारला जंग-जंग पछाडावे लागले.

अका हे सहा हजार फूट उंच डोंगरांत राहतात. आपण त्या प्रदेशांत कुठून आलों, त्याबद्दल ते पुढील आख्यायिका सांगतात – आमचे पूर्वज खालच्या सपाटीवर बिशनाथाच्या उत्तरेस गिलधरी नदीच्या कांठीं राहत होते. कृष्ण व बलराम यांनी त्यांना तिथून हुसकावून लावलें व ते या डोंगराळ भागांत आले.

तर्क असा आहे, की आहोम टोळीवाले आसामांत घुसले, त्यांच्या पूर्वींच हे लोक आसामचे रहिवासी झालेले असावे व आहोमांनी पिटाळून लावल्यामुळे, ते नेफाच्या डोंगराळ भागांत येऊन स्थायिक झाले असावे. यांची संख्या अत्यल्प असून यांच्या दोन वेगवेगळचा वसाहती आहेत. मोठ्या वसाहतींत कापाचोर व लहान वसाहतींत हजारीखावा राहतात. यांचीच एक तिसरी टोळी आहे. त्यांना अंकामिरी म्हणतात. अंका लोक मिजी लोकांना आपले मित्र मानतात. मिजी हे बहुसंख्य आहेत. अंकालोक संकटप्रसंगीं मिजींची मदत घेतात. मिजी हे सखल प्रदेशांत क्वचितच येतात. अकांच्या दहा कुळचा आहेत.

अका लोक तीरकमठा, भाला, तलवार व बंदूक हीं हत्यारें कौशल्याने चालवितात. ते तीं स्वतःच बनवितात. गनिमी युद्धांत ते प्रवीण असतात. त्यांचा पोजाचा हक्क आजमितीपर्यंत त्यांनी चालू ठेवला आहे. दरवर्षी माघ–फाल्गुनांत ते सपाटीला उतरून तिथल्या मुलखांतून पोजा वसूल करतात.

हरिदेव हा त्यांचा मुख्य देव आहे. याशिवाय फुक्सु हा जंगलाचा व पाण्याचा देव, फिरान व सिमन हे युद्धाचे देव व सातु हा गृह आणि शेती यांचा देव होय. त्यांचीं अन्यहि कांही दैवतें आहेत. ते आपल्या देवांसाठी मंदिरें अथवा झोपडचा बनवितात. त्यांच्या देवप्रतिमा चांदीच्या किंवा सोन्याच्याहि असतात. या प्रतिमा त्यांना त्यांचे शेजारी भोटिया यांच्याकडून मिळाल्या असाव्या असें वाटतें. ते देवांच्या पुजाऱ्याला देवरी म्हणतात. देवरीची निवड दैवी दृष्टांतानुसार होते. देवपूजा आणि बलिकर्म देवरी करतो. अका लोक देवांना गायी, बकऱ्या, कोंबडीं आणि कबुतरें यांचे बलि देतात. त्यांचा शकुनावर विलक्षण विश्वास आहे. घर बांधतांना ते प्रथम त्या जागीं बलिदान करतात व फुक्सूची पूजा करतात. घरें बळकट बांधतात. छप्पर एक प्रकारच्या रुंद पानांचें करतात. कुटुंबांतलीं सर्व माणसें व कुटुंबांतले दास, सर्व मिळून एकाच घरांत राहतात. घरांत तांब्या-पितळेचीं भांडीं वापरतात; मातीचीं वापरीत नाहीत. धान्याचीं कोठारें व गुरांचे गोठे घरापासून लांब ठेवतात. त्यांना औषध माहीत नाही. ते रोग्याला उपचार म्हणून देवरीकडून गंडे, दोरे बांधून घेतात. ते लुटारू असले तरी चांगले शेतकरीहि आहेत. अन्नोत्पादनाच्या बाबतींत ते स्वावलंबी आहेत. ते भात व भाजीपाला पिकवितात. गायी बाळगतात व त्यांचें मांस खातात; पण दुधाला मात्र स्पर्श करीत नाहीत. डुकरें, कोंबडीं व कबुतरेंहि पाळतात. त्यांना अफूचें व्यसन जबरदस्त असतें. बायकाहि त्यांतून सुटलेल्या नाहीत. ते मोड नांवाची कडक दारू स्वतःच बनवून पितात. त्यांचा पोषाख आसाममधल्या इतर टोळीवाल्यांसारखाच असतो. त्यांचें शिरस्त्राण वेताचें बनविलेलें व तीन इंच उंच असतें. त्याला दोन पिसें लावतात. अकांचें शरीर धडधाकट व पिळदार असतें.

अकांमध्ये बहुपत्नीकत्वाची चाल आहे. अका आणि मिजी यांच्यांत बेटीव्यवहार होतो. विवाहाच्या दिवशीं देवांच्या कृपेसाठी बलिदान करतात. जमलेल्या मंडळीला त्याच पशूंची मेजवानी मिळते. विवाहाचा सोहळा पांच दिवस चालतो. वधू-वरांना कापडाच्या छताखालीं उभीं करून देवरी त्यांच्या भोवती एक कापडाचा तुकडा हालवितो व तीं दोघें पति-पत्नी झाल्याचें जाहीर करतो.

स्त्री प्रसूत होत असतां पशुबळि देतात. मुला-मुलींत भेद करीत नाहीत.

अडीच-तीन हात खोल खड्डा करून प्रेतें पुरतात. प्रेताच्या शेजारीं त्याचीं हत्यारें ठेवतात. उरलेल्या जागेवर वस्त्र पसरून त्याच्याभोवती बांबूचें कुंपण घालतात. **पाहा** – मिजी. [ इंडियाज् नॉर्थ ईस्ट फ्रंटियर इन् नाइन्टीन्थ् सेंचरी–व्हेरियर एल्विन ]

**अकादमी** अखिल भारतीय स्वरूपाचें सांस्कृतिक व कला-विषयक कार्य करणारी महासंस्था. ही राष्ट्रीय संस्कृति ट्रस्टद्वारा नवी दिल्ली येथे स्थापन झाली असून, साहित्य अकादमी, ललितकला अकादमी व संगीत नाटक अकादमी असे हिचे तीन विभाग आहेत.

अकादमी (अकॅडमी) हा मूळ ग्रीक शब्द आहे. याची व्युत्पत्ति मनोरंजक आहे. ग्रीक वीर अकॅडमीस याच्या नांवाने अथेन्स शहराजवळ एक बाग होती. या बागेंत प्लेटो या महान् ग्रीक तत्त्वज्ञाने ५० वर्षें आपल्या अनुयायांना तत्त्वज्ञान उपदेशिलें. त्यावरून अकॅडमी याचा अर्थ विद्यापीठ किंवा सरस्वतीमंदिर असा झाला. पुढे लक्षणेने या विद्यापीठालाच अकॅडमी असें नांव पडलें. प्लेटोच्या पूर्वींहि युरोपांत विद्वत्संघांच्या रूपानें अशा अकादमी निर्माण होऊं लागल्या होत्या. आजमितीस बहुतेक देशांत अशा प्रकारच्या अनेक अकादमी स्थापित होऊन त्या विज्ञान, साहित्य, दर्शन, इतिहास, चिकित्सा, ललितकला

इ. क्षेत्रांत महत्त्वाचें कार्य करीत आहेत. लोकशाही विचार आणि भावना यांची जसजशी प्रगति होत आहे, तसतसें या अकादमींच्या धारणेंत आणि कार्यपद्धतींत नवें परिवर्तन घडत आहे. आजच्या कित्येक अकादमी लोकजीवनाची कदर करून त्याच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. जनतेची अभिरुचि, विचारधारा आणि तिचे कलाप्रकार अभ्यासून, आत्मसात् करून त्यांच्या मध्ये चैतन्य आणावें, या दृष्टीने त्यांनी कार्य सुरू केलें आहे.

भारतांत या दृष्टीने आजमितीस तीन अकादमी कार्य करीत आहेत. १९५३ सालीं प्रथम संगीत नाटक अकादमीची स्थापना झाली व राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी तिचें उद्घाटन केलें. भारतीय नृत्य, नाटक, चित्रपट व संगीत या कलांना उत्तेजन देऊन त्यांचा विकास करणें व त्यांद्वारे भारताचें सांस्कृतिक ऐक्य घडवून आणणें, हा या संगीत नाटक अकादमीचा उद्देश आहे. १९५४ सालीं भारताचे उपराष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् यांच्या हस्तें साहित्य अकादमीचें व मौलाना अबुल कलाम आझाद यांच्या हस्तें ललितकला अकादमीचें उद्घाटन झालें. भारतांतील सर्व भाषांच्या साहित्याचा विकास घडवून आणणें, त्याचा दर्जा वाढविणें व साहित्यविषयक चळवळींना प्रोत्साहन देणें व अशा प्रकारें देशाची सांस्कृतिक एकात्मता दृढ करणें, हें या संस्थेचें ध्येय आहे. सर्व दृश्य कलांचा विकास करणें, त्यांचें संशोधन करणें, इ. उद्देश ललितकला अकादमीने आपल्यापुढे ठेवले आहेत.

या तिन्हीहि संस्थांची स्थापना होतांना स्पष्टपणे जाहीर करण्यांत आलें आहे, की त्या पूर्णपणे स्वायत्त राहतील. त्यांच्या चळवळींत किंवा कारभारांत सरकार ढवळाढवळ करणार नाही. या सर्व अकादमींचें अधिष्ठान जवळजवळ सारखें आहे. प्रत्येक अकादमीचें एक ७० सदस्यांचें सल्लागार मंडळ (General Council) असतें. हे सदस्य सरकारनियुक्त असतात व ते सर्व राज्यांतून, भाषिक गटांतून आणि सांस्कृतिक व शिक्षणसंस्थांतून आलेले असतात. ती अंतिम स्वरूपाची सर्वाधिकारसमिति असते. प्रत्येक अकादमीचें एक कार्यकारी मंडळहि आहे. त्याच्यावर सल्लागार मंडळाची हुकुमत असते. त्यांशिवाय एक अर्थसमितिहि आहे. संस्थेचा आर्थिक व्यवहार बघणें हें तिचें काम. अध्यक्ष, खजिनदार आणि चिटणीस हे अकादमीचे मुख्य कर्णधार आहेत.

**संगीत नाटक अकादमी** – पूर्वी नृत्य आणि संगीत या दोन्ही कलांना राजेरजवाडे व संस्थानें यांच्याकडून आश्रय मिळत असे. पण संस्थानें विलीन झाल्यावर हा आश्रय तुटला. ती पोकळी भरून काढण्यासाठी संगीत नाटक अकादमीची स्थापना झाली आहे. भारत हा एक खंडप्राय देश असल्याने संगीत व नाटक यांसारख्या सार्वदेशिक कलांच्या वृद्धीचें कार्य पाहणें एका अकादमीला झेपण्यासारखें नव्हतें. म्हणून प्रादेशिक अकादमींची स्थापना झाली आहे. अशा अकादमी आसाम, बिहार, म्हैसूर, मद्रास, उडीसा आणि इतरत्रहि कांही ठिकाणीं स्थापन झाल्या आहेत. देशांतील मोठ्या शहरांतून सुसज्ज अशीं नाट्यगृहें बांधण्याचें अकादमीचें ध्येय आहे; पण तें सिद्ध व्हायला अजून अवधि लागणार आहे. अकादमीने दिल्ली शहरांत दोन हजार लोक बसतील एवढें एक 'एअर कंडिशन्ड' राष्ट्रीय नाट्यगृह बांधण्याचा संकल्प केला आहे.

अकादमी एक ग्रंथालय आणि वस्तुसंग्रहालय बांधीत आहे. त्यांत मौल्यवान ग्रंथ, ध्वनिमुद्रिका, अनुबोधपट आणि कांही वाद्यें जतन करून ठेवली जाणार आहेत. ध्वनिमुद्रिका अभिजात संगीताच्या – गायन व वादन दोहोंच्याहि – असतील. त्या हिंदुस्थानी संगीत व कर्नाटक संगीत अशा दोन्ही संप्रदायांच्या राहतील. देशांतील विविध संस्थांना मान्यता देण्याच्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां एक तज्ज्ञांची समिति स्थापन करण्यांत आली आहे. अकादमीकडून अड्यारचें कलाक्षेत्र, दि म्युझिक सोसायटी–मद्रास, भातखंडे संगीत विद्यापीठ–लखनौ, बहुरूपी – कलकत्ता, दि इंडियन नॅशनल थिएटर–मुंबई, इ. संस्थांना अकादमीकडून आर्थिक साहाय्य मिळत असतें. कलेचे विविध प्रकार लोकप्रिय व्हावे म्हणून अकादमीने कांही महोत्सवहि केले आहेत. १९५४ सालीं दिल्लीमध्ये एक मोठा संगीत महोत्सव झाला. असाच एक महोत्सव १९५६ सालीं पाटण्यामध्येहि झाला. नाट्यमहोत्सवांत देशांतील सर्व भाषांतील नाटकें झालीं व उत्कृष्ट नाटकांना पारितोषिकें देण्यांत आलीं. राष्ट्रीय नृत्यमहोत्सवांत भरतनाट्यम्, कथकळि, मणिपुरी आणि कथक, या नृत्यप्रकारांचे प्रयोग, देशांतील प्रथितयश मंडळ्यांनीं सादर केले.

नृत्य, नाटक आणि संगीत ह्यांनाच तेवढें प्रोत्साहन देणें हें अकादमीचें ध्येय नाही. प्रस्तुत कलांशीं संबद्ध असलेल्या इतर कलाप्रकारांच्या विविध प्रश्नांचा अभ्यास करण्याचीहि तिला आवश्यकता भासली आहे. त्यासाठी तिने मेळावे भरविले आहेत. असा एक चित्रपटमेळावा १९५५ च्या फेब्रुवारींत भरला. त्याला भारताबाहेरील पाहुणेहि उपस्थित होते. पंतप्रधान श्री. नेहरू यांनी त्याचें उद्घाटन केलें. एक नाट्यमेळावा १९५६ च्या मार्चमध्ये भरला. या मेळाव्यांत आंतरभारतीचे नाटककार आणि नाट्यदिग्दर्शक यांनी भाग घेतला होता. मेळाव्याचें कामकाज उत्साहपूर्ण आणि उपयुक्त झालें. १९५७ सालीं एक संगीतमेळावा भरला. ज्या वेळीं परदेशांतील

शिष्टमंडळें आपल्या देशाला भेट देतात, तेव्हा अकादमी त्यांच्यासाठी सांस्कृतिक कार्यक्रम घडवून आणते. चीन आणि रशिया या देशांत सांस्कृतिक शिष्टमंडळें पाठविण्याकरितांहि अकादमीनें सरकारला बहुमोल साहाय्य केलें आहे.

संगीत, नाटक आणि नृत्य या तिन्ही क्षेत्रांतील श्रेष्ठ कलावंतांना त्यापूर्वीं राष्ट्रपतिपारितोषिकें दिलीं जात असत. याच पारितोषिकांना आता अकादमीपारितोषिकें असें नामाभिधान देण्यांत आलें आहे. हीं पारितोषिकें कायद्याप्रमाणे अर्थात् राष्ट्रपतींच्याच हस्तें दिलीं जातात. नृत्य आणि नाटक यांसाठी प्रत्येकी दोन पारितोषिकें आहेत. हिंदुस्थानी आणि कर्नाटक संगीत, गायन आणि वादन मिळून चार पारितोषिकें आहेत. याशिवाय लोकनृत्यमहोत्सवांत भाग घेणाऱ्या मंडळचांसाठीहि पारितोषिकें राखून ठेवण्यांत आलीं आहेत, तीं वेगळींच. हा लोकनृत्यमहोत्सव प्रजासत्ताक-दिनाच्या समारंभांत होतो.

**साहित्य अकादमी —** भारतामध्ये चौदा प्रमुख भाषा असून त्यांची साहित्यिक परंपरा वैभवशाली आहे. परंतु एकापेक्षा दोन भाषा जाणणारे व त्या भाषेंतील साहित्याचें रसग्रहण करणारे फार क्वचितच आढळतात. त्यामुळे भारतांतील सर्व साहित्याचें परिशीलन केलेले लोक आढळणें कठीण आहे. अशा परिस्थितींत भारतीय साहित्य अकादमीची स्थिति इतर देशांतील अकादमींहून थोडी गुंतागुंतीची झाल्यास नवल नाही. तिचें कामकाजहि इतर अकादमींहून कठीण आहे. कथकळीचें रसग्रहण आसाममधील लोक करूं शकतील आणि मणिपुरी नृत्यहि केरळवासींना कळणें शक्य आहे. पण मल्याळी साहित्यांतील कांही श्रेष्ठ कृती जर आसाममध्यें नेल्या, तर त्या तिकडे कुणाला समजणारच नाहीत. भारतांतील कुठल्याहि एका भाषेंतील लेखकाला दुसऱ्या भाषेंतील साहित्यांत काय चाललें आहे आणि काय मोलाचें आहे, तें प्रत्यक्षपणे जाणून घेतां येत नाही.

म्हणून भिन्न भिन्न भाषांतील श्रेष्ठ कलाकृतींना प्रोत्साहन देणें आणि त्याच्याहि पुढे भारतांतील सर्व भाषांतील साहित्य हें भारतीय साहित्य असें समजून व त्या साहित्यांतील श्रेष्ठ कलाकृतींचे इतर भाषांत अनुवाद करून त्यांचा प्रसार करणें, हें साहित्यअकादमीचें एक उद्दिष्ट आहे. अकादमीचा दृष्टिक्षेपांतील कार्यक्रम म्हणजे सर्व भाषांतील ग्रंथांची एक सूची तयार करणें आणि लेखकांचा परिचय प्रसिद्ध करणें हा आहे. हें कार्य तूर्त चालू आहे. भारतांतील सर्व चौदा भाषांतील ग्रंथांचा आणि भारतामध्ये प्रसिद्ध झालेल्या इंग्रजी ग्रंथांचा व भारतीय नागरिकांनी इंग्रजींत लिहिलेल्या ग्रंथांचाहि त्या ग्रंथसूचींत अंतर्भाव होणार आहे.

सर्व भारतीय भाषांच्या साहित्याचे इतिहास लिहिणें, हा साहित्यअकादमीचा आणखी एक कार्यक्रम आहे. हे इतिहासग्रंथ प्रत्येकीं ३०० पृष्ठांचे असतील. ते लिहिण्याचें काम त्या त्या भाषेंतील अधिकारी पंडितांकडे सोंपविण्यांत आलें आहे. ते तद्देशीय किंवा इंग्रजी भाषेंत लिहिले जाणार असून मग त्यांचीं इतर भारतीय भाषांत भाषांतरें होणार आहेत.

कविता, लघुकथा आणि नाटकें यांचे प्रत्येक भाषेंत संकलनात्मक ग्रंथ तयार होत आहेत. त्यांचीं इतर भाषांतहि भाषांतरें व्हायचीं आहेत. ही भाषांतरें भारतांतील आधुनिक १३ भाषांत होणार असून कांही अपवादात्मक भाषांतरें इंग्रजींतहि व्हायचीं आहेत.

संस्कृताविषयींचा कार्यक्रम वेगळा आहे. संस्कृत साहित्याचा एक संग्रह चार खंडांत तयार होणार आहे. कालिदासाचे ग्रंथहि प्रकाशित करण्याचा अकादमीचा मानस आहे. साहित्य अकादमीच्या सल्लागार समितीनें अनुवादित करायला लायक असलेल्या ग्रंथांची यादी बनविली आहे. याशिवाय परकी भाषेंतील जे शंभर ग्रंथ भारतीय भाषांतून अनुवादिले जाणार आहेत, त्यांची यादीहि तयार झाली आहे. त्या कार्याची सुरवात म्हणून २५ ग्रंथांची निवडहि झाली आहे. या ग्रंथांपैकी कांहींचे अनुवाद प्रकाशित झाले असून बाकीचे लवकरच प्रकाशित होणार आहेत. कांही श्रेष्ठ दर्जाच्या ग्रंथांच्या प्रकाशनासाठी अकादमी आर्थिक मदतहि करते; मात्र त्यांचें महत्त्व राष्ट्रीय स्वरूपाचें असलें पाहिजे. दर तीन वर्षांमागे प्रकाशित झालेल्या अव्वल दर्जाच्या कलाकृतींना ५००० रुपयांचें एक राष्ट्रीय पारितोषिकहि देण्यांत येतें. संस्कृतावरून लिहिलेल्या ग्रंथांसाठीहि एक वेगळें पारितोषिक आहे. हे ग्रंथ इंग्रजींत किंवा अन्य कोणत्याहि भाषेंत लिहिले तरी चालतात. कांही वर्षांमागे दिल्लींत 'युनेस्को'ची परिषद भरली असतां साहित्य अकादमीनें प्रादेशिक साहित्यांतील ग्रंथांचें एक प्रदर्शन भरविलें. त्यांत निवडक २०००० ग्रंथांचा अंतर्भाव झाला होता. साहित्यअकादमी एक ग्रंथालय बांधीत असून त्याची पंधरा विभागांत विभागणी होणार आहे. त्यांत प्रत्येक भाषेसाठी स्वतंत्र विभाग व इंग्रजीसाठीहि एक वेगळा विभाग राहणार आहे.

**ललितकला अकादमी —** ललितकला अकादमीचें उद्घाटन करतांना मौलाना अबुल कलाम आझाद म्हणाले होते, की अकादमीनें प्राचीन वैभवशाली परंपरेचें जतन केलें पाहिजे व तींत अर्वाचीन कलावंतांच्या कलाकृतींचीहि भर घातली पाहिजे. त्याचप्रमाणे तिनें कलेचा दर्जा आणि लोकांची अभिरुचिहि सुधारली पाहिजे. तो हेतु लक्षांत घेऊन अकादमीनें आपला कार्यक्रम आखला आहे, तो पुढीलप्रमाणे —

(१) कलेचीं राष्ट्रीय प्रदर्शनें (२) परदेशांतील प्रदर्शनें (३) भारतीय कलेचीं परदेशांतील प्रदर्शनें (४) लोककला आणि कारागिरी यांचें निरीक्षण (५) लेण्यांतील आणि तत्सम चित्रांच्या नकला करणें (६) प्रकाशनाचा कार्यक्रम आणि (७) कलाविषयक संस्थांना मान्यता व मदत देणें.

प्रचलित भारतीय कलाकृतींना प्रसिद्धि मिळवून देणें हा राष्ट्रीय कलाप्रदर्शनांमागील हेतु आहे. दर वर्षी अशीं प्रदर्शनें भरायचीं आहेत. आतापर्यंत अशीं कांही प्रदर्शनें भरलीं आहेत. प्रदर्शनांमध्ये कलावंतांना बक्षिसें देण्यांत येतात. आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रदर्शन भरलें तर, देशांतील कलाप्रेमी लोकांच्या अनुभवांत भर पडेल, म्हणून अकादमीनें परदेशांतील कलाकृतींचीं प्रदर्शनेंहि भरविलीं आहेत. पहिलें प्रदर्शन ३१ कॅनेडियन कलाकृतींचें होतें. ह्या कलाकृती कॅनडाच्या नॅशनल गॅलरी ऑफ् आर्ट या संस्थेनें सादर केल्या होत्या. त्या प्रदर्शनानंतर दुसरें प्रदर्शन हंगेरियन लोककलेचें भरलें. तिसरें चिनी हस्तकलेचें होतें. हीं प्रदर्शनें दिल्ली, कलकत्ता, मद्रास आणि मुंबई या शहरांत भरलीं. या शहरांतून प्रदर्शित करण्यांत आलेलें आणखी एक प्रदर्शन म्हणजे पोलीश कलांचें होय. अर्वाचीन जर्मन कलेचें एक प्रदर्शन वरच्या प्रमाणेंच भरलें. परदेशांतील भारतीय कलेच्या रसिकांना भारतीय कला पाहतां याव्या म्हणून अकादमी सर्व प्रकारें मदत करते. एक भारतीय प्रदर्शन युरोपांत पाठविण्यांत आलें. कलाप्रदर्शनें आणि शिष्टमंडळें, लंडन, अफगाणिस्तान, इजिप्त, तुर्कस्तान, इराक, चीन, जपान, ऑस्ट्रेलिया, अमेरिका, रशिया, पोलंड, पश्चिम जर्मनी, इटली आणि युगोस्लाविया या देशांत पाठविण्यांत आलीं.

देशांतील समृद्ध लोककलांचें परिशीलन करणें, हा अकादमीचा महत्त्वाचा कार्यक्रम आहे. त्या कलांसंबंधीची माहिती गोळा करणें व त्या क्षेत्रांत काम करणाऱ्या कलाकारांना मदत करणें हा त्यामागील हेतु आहे. प्राचीन इमारतींचीं, अवशेषांचीं, शिल्पकृतींचीं आणि चित्रकृतींचीं छायाचित्रें काढून त्यांचा संग्रह करणें हाहि अकादमीचा एक कार्यक्रम आहे. असा संग्रह म्हणजे तें एक चित्रकलेचें संग्रहालयच होणार आहे. अकादमीनें भारतांतल्या लेण्यांतल्या व इतरत्र असलेल्या भित्तिचित्रांच्या नकला करण्याचें काम हातीं घेतलें असून बदामीच्या लेण्यापासून त्याची सुरवात झाली आहे.

१९५६ सालच्या फेब्रुवारींत दिल्ली शहरांत अकादमीनें कलाशिक्षणाचा एक मेळावा भरविला. या मेळाव्यांत मोठमोठे कलावंत, कलेचे इतिहासकार, कलामर्मज्ञ, कलाशिक्षक, आणि शिक्षणतज्ञ यांनीं भाग घेतला होता. या मेळाव्यानें अकादमीला सूचना केली ती अशी– शिक्षणांतील कलेचें उद्दिष्ट माणसाची बौद्धिक शारीरिक आणि आध्यात्मिक वाढ होऊन त्यानें आदर्श व्यक्ति आणि आदर्श नागरिक बनावें, हें असावें आणि या ध्येयानुसार शिक्षणाच्या अभ्यासक्रमांत आवश्यक त्या गोष्टींची भर पडावी. माणसाची अशी वाढ होण्याकरितां कलेला मोठाच हातभार लावतां येईल. मात्र त्यासाठी अभ्यास क्रमाच्या सुरुवातीच्या अवस्थेंत एक महत्त्वाचा भाग म्हणून तिचा अंतर्भाव झाला पाहिजे.

अकादमीच्या प्रकाशनाच्या कार्यक्रमांत भारतीय कलाविषयक ग्रंथ आणि चित्रसंग्रह प्रसिद्ध करणें या गोष्टींचा अंतर्भाव झाला आहे. आतांपर्यंत अशीं अनेक प्रकाशनें झालीं आहेत. अकादमी ललितकला या नांवाचें एक द्वैवार्षिक नियतकालिकहि प्रसिद्ध करते.

आकादमीनें देशांतील सुमारें वीस कलासंस्था आणि संघटना यांना मान्यता दिली आहे. या संस्था आणि संघटना अकादमीला सर्व प्रकारें साहाय्य करीत असून त्यांच्या कार्याची व्याप्ति वाढावी व त्यांची उपयुक्तता जनतेच्या निदर्शनास यावी, म्हणून अकादमी त्यांना योग्य ती आर्थिक मदतहि करीत असते.

भारतसरकारच्या विनंतीवरून आकादमीनें बुद्धजयंतीच्या निमित्तानें एक कलाप्रदर्शन भरविलें. या प्रदर्शनांत बौद्ध-चित्रकला, शिल्पकला, जुनीं हस्तलिखितें आणि इतर चित्रें यांचा अंतर्भाव झाला होता. हें सर्व साहित्य भारतांतील व भारताबाहेरील देशांतील वस्तु-संग्रहालयांतून, तसेंच खाजगी संग्रहालयांतूनहि गोळा करण्यांत आलें होतें. हें प्रदर्शन फारच प्रेक्षणीय झालें. त्या वेळीं दिल्लींत युनेस्कोची परिषद भरली होती. त्या परिषदेला आलेल्या सदस्यांना आणि इतर लोकांनाहि तें प्रदर्शन परिणामकारक वाटलें.

या तीनहि अकादमींना लवकरच एकत्र एका वास्तूंत आणण्याची योजना भारत सरकारच्या शिक्षण खात्यानें आंखली आहे. [ के. एम्. जॉर्ज; म. ज्ञा. को. ]

**अकाली** एक धार्मिक पंथ. अकाल म्हणजे कालरहित, किंवा ज्याच्यावर कालाची सत्ता चालत नाही तो; म्हणजेच परमेश्वर आणि त्याची उपासना करणारा तो अकाली होय. कांही लोक त्याचा अर्थ कालालाहि न डरणारा असा करतात. शीख धर्मांत या शब्दाला विशेष महत्त्व आहे. गुरु नानकदेव यांनी कालातीत परमेश्वराची उपासना अकाल या नांवानें प्रचलित केली. ‘ जातिगत, धर्मगत व देशगत भावांतून मुक्त होऊन विश्वांतल्या समस्त धर्मांच्या लोकांवर प्रेम करावें. त्यांच्याशीं विरोध न धरतां मैत्रीभावानें वागावें; कारण, सर्व मानवजात त्या अकाल पुरुषाचीच संतति आहे, ’

असा गुरु नानक यांचा उपदेश आहे. सत् श्री अकाल ही या पंथाची घोषणा आहे.

याच परंपरेंत पुढे शीखांचा सहावा गुरु हरगोविंद याने अकाली पंथाची स्थापना केली. त्याने अमृतसरच्या सुवर्ण मंदिरासमोर अकालतख्त स्थापन केलें. त्याला अकालबुंग असें नांव आहे. बुंग म्हणजे ज्यावर घुमट आहे, असें एक महाभवन.

या अकालबुंगांत अकाली लोकांच्या गुप्तमंत्रणा व चर्चा होऊं लागल्या. त्यांत जे निर्णय होत त्यांना गुरुमतां अर्थात् गुरूचा आदेश असें नांव दिलें गेलें. धार्मिक समारंभाच्या स्वरुपांत अकाली दलाचीं तिथे अनेक संमेलनें भरत; पण त्यांचा मुख्य उद्देश मोगलांच्या अत्याचारांपासून जनतेचें रक्षण कसें करावें, हाच असे. याच कारणामुळे अकाली चळवळीला राजनैतिक वळण लागलें. जो नामवाणीचा प्रेमी, त्यागी आणि विरक्त असेल, तोच अकालबुंगाचा सभासद होऊं शके. अकाली लोक शूर, निर्भय आणि स्वतंत्र असत. बाल, वृद्ध, दुबळे आणि अबला यांचें प्राणपणाने संरक्षण करणें, हा ते आपला धर्म समजत.

१६९९ सालीं गुरु गोविंदसिंह यानें खालसा पंथ स्थापला. अकाली लोकच त्या पंथाचे अनुयायी होते. औरंगजेबाच्या अत्याचारांना सामना देण्यासाठी अकाली लोक सेनादळाच्या स्वरूपांत संघटित झाले. निळें वस्त्र आणि पांच ककार (कच्छ, कडा, कृपाण, केश व कंघा) धारण करण्याची गुरूने त्यांना आज्ञा केली. तेव्हापासून पांच ककार हे अकाली पुरुषांना अनिवार्य ठरले आहेत. त्यांच्या लष्करी बाण्यामुळे त्यांना निहंग अशीहि संज्ञा मिळाली. निहंग हा फारसी शब्द असून, त्याचा अर्थ निर्भय असा आहे. शीखांच्या इतिहासांत अकालींनी महत्त्वाची कामगिरी बजाविली आहे. निहंग ब्रह्मचर्याने व साधुवृत्तीने राहत. ते दलितांचें आणि दुर्बलांचें संरक्षण करीत, तसाच शीख धर्माचा प्रचारहि करीत. हे भ्रमणशील असत. त्यांची ही पक्षिवृत्ति पाहून कांही लोक त्यांना निहंगच्या ऐवजीं विहंग म्हणत. अफगाणांच्या आक्रमणांना तोंड देणें व अत्याचारी टोळ्यांपासून हिंदु स्त्रियांचें रक्षण करणें हें त्यांचें नित्याचें कार्य होतें.

महाराजा रणजितसिंह (इ. स. १७८० ते १८३९) याच्या काळांत अकाली सेनादल उत्कर्षाच्या शिखरावर होतें. या अकाली सैन्याच्या बळावरच मुलतान, काश्मीर, अटक, नौशेरा, जमशेद, अफगाणिस्तान इथवर रणजितसिंहाने आपला राज्यविस्तार केला. फुलासिंग हा त्या वेळीं अकालींचा पुढारी होता. हा त्या पंथाच्या सर्व गुणदोषांचें प्रतीक होता. इ. स. १८०९ मध्ये अमृतसर येथे मेटकाफच्या तुकडीवर हा आपल्या दलासह तुटून पडला आणि त्यामुळेच प्रसिद्धीस आला. इ. स. १८१८ मध्यें वेढ्यांत सांपडलेला मुलतानचा किल्ला याने जबरदस्त पराक्रम करून सर करण्याच्या बेतांत आणला होता. रणजितसिंहाने हा त्याचा पराक्रम पाहून त्याला सिंधच्या खोऱ्यांत मुख्य अधिकारी नेमलें. पुढे १८२३ मधील तेरीच्या लढाईंत यानें आपल्या दलासह युसफझईवर चढाई केली. युसफझईचा पराभव झाला खरा; पण फुलासिंगाला त्या युद्धांत मरण आलें. त्याचें स्मारक नौशेरा येथे असून हिंदु व मुस्लीम दोन्ही जाती त्याला मान देतात.

अकाली दलाबद्दल फुलासिंगाच्या पूर्वीपासूनच त्याच्या शत्रूंना व मित्रांनाहि दरारा वाटत असे. शीख सरदारांनाहि त्याची भीति वाटे. पुष्कळदा अकाली लोक त्यांच्याकडून बलप्रयोगाने खंडणी वसूल करीत. १८२३ नंतर रणजितसिंहाने हळूहळू त्यांचें महत्त्व नष्ट केलें. इंग्रजांनाहि अकालींचा धाक वाटत होता. ते अनेक मार्गांनीं त्यांना दाबण्याचा प्रयत्न करीत होते.

शीख गुरूंनी आपल्या धर्माच्या प्रसारासाठी अनेक गुरुद्वारे स्थापले होते व त्यांच्या योगक्षेमासाठी रणजितसिंहाने मोठमोठ्या जहागिऱ्या लावून दिल्या होत्या. इंग्रजी राज्यांत या जहागिऱ्यांचे अधिकार ज्यांच्या हातांत होते, त्यांच्यापैकी पुष्कळसे महंत पुढें दुराचरणी बनले. त्यांच्यामुळे शीख धर्माला कलंक लागण्याची वेळ आली. गुरुद्वारे हीं अनीतीचीं आगरें बनलीं. अशा महंतांच्या हातांतून गुरुद्वाऱ्यांचा उद्धार करण्यासाठी १९२० सालीं अकाली तरुणांनी आपलें नवें सेनादळ संघटित केलें. त्यांनी अनेक ठिकाणच्या मठांतून दुराचरणी महंतांना हुसकावून देऊन ते मठ आपल्या ताब्यांत घेतले. या कार्यांत अनेक अकाली वीरांना आत्मबलिदानहि करावें लागलें. ब्रिटिश सरकारने सुरवातीस महंतांना बरीच मदत केली; पण शेवटीं अकाली दलाचाच विजय झाला. सन १९२५ पर्यंत सगळे गुरुद्वारे शिरोमणि गुरुद्वारा कमिटीच्या सत्तेखाली आले. या कामीं अकाली लोकांना म. गांधींनी पुष्कळ मदत केली व भारतीय कॉंग्रेसनेहि अकाली आंदोलनाचा पुरस्कार केला.

१९२५ सालीं ब्रिटिश सरकारने गुरुद्वारा कायदा निर्माण केला. तदनुसार १९२६ सालीं गुरुद्वाराप्रबंधक समितीचें पहिलें निर्वाचन झालें. या समितीचें प्रमुख कार्य गुरुद्वाऱ्यांची देखरेख, धर्मप्रचार, विद्याप्रसार, इ. आहे. शिरोमणि गुरुद्वारा प्रबंधक समितीहून वेगळें असें एक केंद्रीय शिरोमणि अकाली दल अमृतसर येथे स्थापन झालें आहे. त्याचे जत्थे प्रत्येक जिल्ह्यांत गुरुद्वाऱ्यांची व्यवस्था आणि जनसेवा इत्यादि कामें

करतात. **पाहा** –शीख धर्म; हरगोविंद, नानक. [ एन्सा. रि. ए.; बलवंतसिंह स्याल ]

**अकुटी बोंगा** याचा वाच्यार्थ वाकडें किंवा कमानीसारखें भूत असा होतो. हा मुंडांचा एक देव आहे. याने पछाडलें, की माणसाला धनुर्वात होतो, असें समजतात. याच्या बलिदानाचा विधि पुढीलप्रमाणे–

कर्ता आपल्या घराशेजारीं सूर्याचा पहिला किरण पडेल अशा जागीं कुंपण घालून थोडीशी जागा बंदिस्त करतो. आंतली जागा शेणानें सारवितो. तिथें एक चटई पालथी घालतो. मग अकुटी बोंगाची पूजा करतो. त्यासाठी कर्त्याला खाण्यापिण्या-बाबत कांही निर्बंध पाळावे लागतात. या बोंगाचे बळी मासिक व वार्षिक असे दोन प्रकारचे असतात. लाल रंगाचा बोकड, लाल कोंबडा, तांदुळांची दारू, गव्हाच्या पिठांत साखर मिसळून बनविलेली मिठाई, हे बळीचे प्राणी व पदार्थ असतात. दोन्ही प्रकारचे बळी सोमवारीं किंवा रविवारीं देतात. या विधीचें आणखीहि बरेंच तंत्र आहे. [ एन्सा. मुं. ]

**अकुल** तंत्रशास्त्रांत शिवाला अकुल व शक्तीला कुल म्हणतात. 'अकुलं शिव इत्युक्तः कुलं शक्तिः प्रकीर्तिता।' **पाहा**–कौल मार्ग.

**अकुलवीर तंत्र** नाथसंप्रदायांतला एक संस्कृत ग्रंथ. सिद्ध-नाथ किंवा मीननाथ यांपैकी कोणीतरी त्याचा कर्ता असावा. कारण दोन्ही प्रकारचे उल्लेख मिळतात.

**अक्क देवतलु** आंध्र प्रदेशांतील कोळी लोकांच्या देवता. या पूर्वी एका घरच्या बहिणी होत्या. त्यांनी एके दिवशीं भांडण करून एकमेकींस ठार मारलें. म्हणून त्या भूतयोनींत गेल्या. पुढे त्या घरांत वाखा उत्पन्न झाला. त्या वेळीं एका भगताच्या अंगांत येऊन त्यानी सांगितलें, की 'आमची पूजा कराल तरच बचावाल.' त्या दिवसापासून तिथले कोळी त्यांना भजूं लागले. समुद्रांत मच्छीमारीला जाण्यापूर्वी ते त्यांना बलिदान करतात. यांच्या ओबडधोबड मृण्मय मूर्ती टेकडीवर समुद्राकडे तोंड करून बसविलेल्या असतात. त्यांना कोणी स्पर्श करायचा नसतो. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**अक्क महादेवी** ( सन ११६० चा सुमार ) म्हैसूर राज्याच्या शिवमोग्ग ( शिमोगा ) या जिल्ह्यांत हिचा जन्म झाला. बापाचें नांव विमल व आईचें सुमति. ही अत्यंत रूपमती होती. तिला पाहून त्या प्रदेशाचा जैन राजा कौशिक मोहित झाला व त्याने तिला मागणी घातली. पण हें लग्न व्हावें असें तिच्या मनांत नव्हतें. कारण, समजा-यला लागल्यापासून तिने पर शिवाला आपला पति मानलें होतें. तिची धारणा होती, की आपलें लग्न चेन्न मल्लिका-र्जुनाशीं केव्हाच लागलें आहे. ती म्हणते–

'आई, माझा प्रियकर अरूप असूनहि रूपवान् आहे. तो मृत्युरहित आहे. तो अवकाश, व्यवधान व चिन्ह यांनीहि रहित आहे. तो अभय, अकुल, असीम आहे. तोच माझा पति. इतर मरणधर्मी पति खड्डयांत जाऊं देत' (वचन शास्त्रसार).

पण आईवडिलांनी गळ घातली म्हणून व राजाज्ञा मानली नाही, तर आपल्या आईबापांवर संकट ओढवेल म्हणून ती त्या लग्नाला तयार झाली. मात्र तिने राजाला अट घातली, की 'माझ्या पूजोपासनेंत तूं व्यत्यय आणतां कामा नये; तसें झाल्यास मी तुझ्यापासून अलग होईन.'

राजाने ती अट मानली; पण पाळली मात्र नाही. अखेर त्याची भोगासक्ति तिला असह्य झाली व तिने त्याचा त्याग केला. ती चेन्नबसवाच्या शोधासाठीं बाहेर पडली. लोकांनी तिला परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला; पण तिने कोणाचेंहि मानलें नाही. स्त्री ही अबला असली तरी तीहि सबला होऊं शकते, हें तिने आपल्या चरित्राने सिद्ध केलें. अध्यात्मसाधनेच्या क्षेत्रांत तिची वीरवाणी असामान्य ठरली आहे. ती म्हणते–

'ज्याने डोंगरांत घर बांधलें, त्याने जंगली जनावरांना घाबरतां कामा नये. समुद्रावर घर करणाऱ्याने लाटांना डरतां कामा नये. बाजारांत बिऱ्हाड मांडील, त्याने कोलाहलाला घाबरतां कामा नये. हे चेन्न मल्लिकार्जुन ! त्याचप्रमाणे मी या संसारांत जन्म घेतला आहे; तेव्हा मलाहि निंदा–स्तुतीच्या आघातांना न भितां शांतीनेच सर्व साहिलें पाहिजे.' ( वचनधर्मसार )

अक्क महादेवी संसारत्याग करुन कल्याणक्षेत्रीं गेली. तिथे तिने मधुर भक्ति व उज्ज्वल चारित्र्य या गुणांनी अनेक शिवशरणांना सन्मार्ग दाखविला. आपलें वीर वैराग्य व निर्भय शिवशरणता यांच्या बळावर वीरशैव भक्तांच्या मालिकेंत तिने महत्त्वाचें स्थान मिळविलें आहे. तिचीं वचनें संख्येने अल्प असलीं, तरी तीं तत्त्वार्थाला भिडणारीं आहेत. योगांगत्रिविधि या नांवाचा हिचा एक छोटासा ग्रंथ असून त्यांत सरळ भाषेंत अध्यात्माचें निरूपण आहे. जीवनाच्या अखेरीस आपलें अंतिम उद्दिष्ट साधण्यासाठी ती कल्याणहून श्रीशैलपर्वतावर गेली व तिथेच शिवैक्य पावली.

राजांनी आदिलशहाची बाजू घेऊन जुन्नरपासून औरंगाबाद-पर्यंतचा त्याचा मुलुख लुटला. अहमदनगरवरहि धाड घातली. तें पाहून औरंगजेबानें शिवाजी महाराजांवर नासीरखानास पाठविलें. पण विजापूरकरांशी तह झाल्यावर ही मोहीम आपोआप थांबली.

पुढे शहाजहान दिल्लीस आजारी पडला व त्याने सर्व सरदारांदेखत दारा शुकोह याला गादीचा वारस नेमलें व तो प्रकृतिस्वास्थ्यासाठी आग्र्यास मुक्काम करून राहिला. तो थोड्या दिवसांत बराहि झाला; पण बंगालमध्ये असणाऱ्या शुजाने स्वतःला बादशहा ही पदवी घेऊन दिल्लीवर चाल केली. मुरादनेहि आपण बादशहा बनल्याचें जाहीर केलें. शहाजहाननें मुरादची तिथून वऱ्हाड प्रांतांत बदली केली; पण मुरादने तो हुकूम मानला नाही. पुढे औरंगजेबहि मुरादला सामील झाला. त्यानंतर त्यांच्या दारा शुकोहशीं दोन लढाया झाल्या. शेवटीं आपल्या बापाला म्हणजे शहाजहानला आग्र्याच्या किल्ल्यांत कैद करून औरंगजेबानें १६५८ सालीं दिल्लीच्या तख्तावर आरोहण केलें. या प्रसंगीं त्याने 'आलमगीर गाझी' अशी पदवी धारण केली. पुढे त्याने दारा शुकोहला पकडून त्याचा शिरच्छेद केला व त्याच्या मुलालाहि ठार मारलें.

औरंगजेब तख्तावर बसल्यानंतर त्याच्या मृत्यूपर्यंतच्या काळाचे सामान्यतः २५।२५ वर्षांचे दोन भाग पाडतात. पैकी त्याचा पहिला कालखंड उत्तरेंत गेला. अफगाण व राजपूत यांचीं बंडें या कालखंडांत मोडतात. दुसरा कालखंड दक्षिणेंत गेला. दक्षिणेंत गेल्यानंतर औरंजेबाला पुनश्च दिल्लीचें तोंड पाहतां आलें नाही.

मराठ्यांना पाणी पाजण्यासाठी म्हणून तो १६८२ सालीं पुनश्च दक्षिणेंत उतरला. त्याने मराठेशाहीवर प्रचंड सैन्यानिशी हल्ला चढविला, पण मराठ्यांनी त्याची दाणादाण उडविली. मराठे जिवावर उदार होऊन त्याच्याशीं लढले.

शिवाजी महाराजांचा पुत्र संभाजी याने इ. स. १६८० ते ८८ या काळांत मोगलांशीं चांगलीच टक्कर दिली. पुढे १६८९ सालीं शेख निजामाने संभाजीला संगमेश्वरीं पकडलें व वडू येथें त्याचा वध करण्यांत आला. त्यानंतर औरंगजेबाने रायगड जिंकला व संभाजीचा पुत्र शाहू याला कैद केलें, पण तरीहि मराठे दबले नाहीत. ते मोगली सैन्यावर जागोजाग हल्ले करीतच राहिले. मोगलांनी मराठ्यांचे किल्ले सर करावे आणि त्यांची पाठ वळतांच मराठ्यांनी पुनश्च ते जिंकून घ्यावे, असा प्रकार सुरू झाला. धनाजी आणि संताजी यांनी तर त्याला 'त्राहि भगवन्' करून सोडलें. औरंगजेबाने शाहूकडून मराठ्यांना पत्रें लिहून त्यांचा बुद्धिभेद करण्याचाहि प्रयत्न केला; पण त्यांतहि त्याला यश आलें नाही.

वर्षानुवर्षे चाललेल्या या युद्धाच्या धुमश्चक्रीमुळे अखेर औरंगजेब जर्जर झाला. तो १७०६ मध्यें अहमदनगरास परतला. मराठ्यांनी त्याचा पाठलाग केला आणि वाटेंत त्याच्यावर हल्ला करून त्याला लुटलें. तो अहमदनगर येथे आजारी पडून इ. स. १७०७ सालीं मृत्यु पावला. मरणाआधी त्याने मृत्युपत्र करून आपलें राज्य आपल्या तीघां मुलांत वांटून दिलें. दौलताबादेजवळ खुलदाबाद येथे त्याच्या शवाचें दफन करण्यांत आलें.

औरंगजेबाच्या एकंदर कारकीर्दीचें निरीक्षण करतांना पुढील कांही गोष्टी ठळकपणे नजरेंत भरतात. त्याची शासनव्यवस्था त्याच्याच ठिकाणीं केंद्रित होती. त्याने राज्याचे सारे अधिकार सम्राट् या नात्याने आपल्याच हातीं ठेवले होते. राज्यांतल्या बारीकसारीक तपशिलाच्या गोष्टीहि तो जातीने पाही. तो सगळे हुकूम स्वतः देत असे. त्याचे सर्व मंत्री आणि अधिकारी त्याच्या कठोर नियंत्रणांत असत. तो एकतंत्र शासनपद्धतीचा पुरस्कर्ता होता. तो म्हणे, की 'जर एकतंत्री शासन जारी केलें नाही, तर राज्यांतले सारे कायदे-कानू मोडले जातील.'

औरंगजेबाचा मृत्यु झाला, त्यावेळीं भारतांतले २० प्रांत त्याच्या साम्राज्यांत समाविष्ट होते. त्यांपकी १४ उत्तर भारतांत आणि ६ दक्षिण भारतांत होते. यद्यपि औरंगजेबाची शासनव्यवस्था एकतंत्री आणि कठोर होती, तरीहि तो पंचवीस वर्षे कायम दक्षिणेंत राहिल्यामुळे अखेरीस उत्तरेंत त्याची सत्ता ढिली पडली. त्याच्या अनुपस्थितीने तिकडच्या सरदारांचें आणि जमीनदारांचें फावलें.

औरंगजेबानें हिंदूवर 'जजिया' कर लादला होता. शिवाय तो हिंदूंकडून यात्राकरहि वसूल करी. आपल्या अमदानींत औरंगजेबाने सैन्य खूप वाढविलें. शहाजहानच्या कारकिर्दींत होई, त्यापेक्षा औरंगजेबाच्या काळांत सैन्यावर दुप्पट खर्च होऊं लागला. जरी औरंगजेबाची सैन्यावर करडी नजर होती, तरी त्याचें सैन्य अकबराच्या सैन्यापेक्षा निकृष्ट दर्जाचेंच राहिलें.

औरंगजेबाच्या व्यक्तिमत्त्वाच्या बाबतींत सांगायचें तर त्याचें जीवन हें एक आदर्श जीवन होतें. तो उद्योगी व संयमी असून त्याचें आचार-विचारांवर कठोर नियंत्रण होतें. त्याचें भोजन साधें असे आणि पोशाखहि साधा असे. चारांपेक्षा अधिक बायका करायच्या नाहीत, हा कुराणप्रणीत नियम त्याने पाळला होता. त्याला अन्य स्त्रियांचें कधीहि आकर्षण वाटलें नाही. त्याला दारूचेंच नव्हे, तर कसलेंहि व्यसन नव्हतें. तो बालपणा-

पासूनच विद्याप्रेमी होता. त्याला ग्रंथांचेंहि प्रेम होतें. तो रोज ५ वेळां नमाज पढे, रमजानचे उपवास करी आणि आपल्या धर्माचें श्रद्धेनें पालन करी. इस्लामशिवाय तो इतर सारे धर्म झूट मानी.

सैनिक आणि सेनापति या स्वरूपांत औरंगजेब त्याच्या वंशांतल्या अनेक सम्राटांपेक्षा श्रेष्ठ होता. त्याच्या ठिकाणीं शरीरबल आणि सहनशीलता तर होतीच; शिवाय प्रसंगीं जीव धोक्यांत घालण्याचीहि त्याची तयारी होती. तो एक कुशल आणि प्रत्युत्पन्नमति असा सेनानी होता. शत्रूची चूकभूल आणि दुर्बलता यांचा तो सदैव लाभ उठवी. कारस्थानें आणि राजनैतिक चलाखी करून तो शत्रूवर मात करी. त्याच्या ठिकाणीं असे अनेक चांगले गुण होते; पण तरीहि त्याचें जीवन हें एक विफल जीवन होतें, असेंच मानावें लागेल.

त्याच्या या विफलतेचीं अनेक कारणें आहेत. त्याने राज्ययंत्र केवळ आपल्याच हातीं केंद्रित करण्याचा प्रयत्न केला आणि दुसऱ्या कोणालाहि विश्वासांत घेतलें नाही. तो बुद्धिमान् होता हें खरें; पण देशांतल्या समस्या यथातथ्य समजून घेऊन प्रसंगानुरूप त्यांची सोडवणूक करण्याइतकी सूक्ष्मता त्याच्या बुद्धींत नव्हती. त्याच्या राजनीतीवर धार्मिक पक्षपाताचा रंग चढलेला असल्यामुळे त्याचें प्रत्येक पाऊल सदोषच पडे. त्याने आपल्या मुलांना योग्य शिक्षण देऊन त्यांना राज्यकारभाराला लायक बनविलें नाही. आपल्या मुलांना तो दूरदूरच ठेवीत होता. आपण आपल्या बापाची जी वासलात लावली, तशीच आपलीं मुलें आपलीहि लावतील अशी त्याला सदैव धास्ती वाटत होती. अकबराने राजपुतांना वश करून घेऊन त्यांच्या साहाय्याने आपलें साम्राज्य वाढविलें होतें. औरंगजेबाने नेमकें त्याच्या उलट केलें. सिसोदिया, राठौड आणि दुसरे राजपूत राजे यांना त्याने आपले कट्टर शत्रू बनविलें. दक्षिणेंतल्या मराठ्यांच्या राज्याचा नाश करण्याची आणि दक्षिणेंतल्याच शियापंथी मुसलमानी शाह्यांचा उच्छेद करण्याची त्याने जी महत्त्वाकांक्षा धरली, ती तर त्याची मोठीच चूक होती. त्याला वाटे, की मुत्सद्देगिरी आणि सैनिकसंघटना यांच्या जोरावर साम्राज्य चिरंतन चालेल. म्हणून त्याने साम्राज्याच्या आर्थिक उन्नतीकडेहि लक्ष दिलें नाही आणि कोणत्याहि कलेला प्रोत्साहन दिलें नाही. त्याच्या ५० वर्षांच्या प्रदीर्घ कारकिर्दींत भारतीय सभ्यतेचें उत्थान न होतां पतनच झालें. तो देशांत शांति आणि सुरक्षा निर्माण करूं शकला नाही. मोगल साम्राज्याच्या पुढील ऱ्हासाला औरंगजेबाचीं चुकीचीं धोरणें कारणीभूत झालीं असें म्हणावें लागेल. [म. ज्ञा. को.; मु. का. भा.]

## औरभ्र

(१) ही एक जमात. हे लोक शेळ्या व मेंढ्या पाळण्याचा धंदा करतात; तसेंच लोकरीच्या घोंगड्याहि तयार करतात. **पाहा**— धनगर. [हि. ध.]

(२) एक आयुर्वेदाचार्य. हा उरभ्राचा पुत्र असून धन्वंतरीच्या अनेक शिष्यांतला एक होता. याचें एक शल्यतंत्र होतें. अष्टांगसंग्रहाच्या इंदुनामक एका पुरातन टीकेंत उरभ्राच्या नांवाने दहा श्लोक उद्धृत केले आहेत. उरभ्र आणि औरभ्र यांचा पिता-पुत्र संबंध होता कीं काय, याविषयीं श्री. भगवद्दत्त संदेह व्यक्त करतात. औरभ्र हा सुश्रुताचा समकालीन होता, असें आयुर्वेदीय ग्रंथांवरून कळून येतें. [आ. इ.]

## औरस

(१) द्वादशविध पुत्रांमध्ये श्रेष्ठ पुत्र. 'सवर्णायां संस्कृतायां स्वयमुत्पादितमौरसं विद्यात्'=संस्कार केलेल्या सवर्ण स्त्रीच्या ठिकाणीं स्वतः उत्पन्न केलेला पुत्र तो औरस होय, असें बौधायन म्हणतो. मनूनेहि अशाच प्रकारची व्याख्या केलेली आहे (९.१६६). धर्मपत्नीपासून उत्पन्न झालेल्या पुत्राला औरस म्हणावें, असें याज्ञवल्क्य सांगतो.

(२) गंधार प्रदेशानजीकची एक जमात. यांचा उल्लेख दरद, ऊर्ज, गुंड, इ. गणांबरोबर केलेला आहे. [पु. इं.]

## और्णवाभ

कौंडिन्याचा शिष्य (बृहदा. ४.५.२६). नैरुक्त नामक व्याकरणकारांच्या मताला अनुसरणारा एक आचार्य. याने दोन ठिकाणीं ऐतिहासिकांचेंहि मत मानलें आहे (निरुक्त ६.१२; १२ १). [प्रा. च. को.]

## और्ध्वदेहिक

मनुष्य मृत झाल्यावर प्रेताच्या दाहसंस्कारापासून तों सपिंडीकरणाच्या पूर्वीं प्रेताला उद्देशून जीं पिंडदानादि कृत्यें केलीं जातात, त्यांना और्ध्वदेहिक म्हणतात. **पाहा** – अंत्यक्रिया; अंत्येष्टि.

## और्व

(१) श्रीहरीने और्व नामक अग्नीचें रूप धारण करून समुद्रांतलें जल प्राशन केलें. ब्रह्माने त्याला महासागरांत कायमचें स्थापलें. यालाच संवत्सर व वडवामुख हीं नांवें आहेत (मत्स्य पु. १२१. ७७). याची और्वी नामक माया प्रसिद्ध आहे (मत्स्य पु. १७४.१८).

(२) एक ऋषि. आप्नुवान् व ऋची यांचा पुत्र. हा मंत्रकर्ता होता. याने सगराला विष्णुपूजेची पद्धति सांगितली. यानेच पित्याच्या मृत्यूनंतर जन्मलेल्या सगराचें आपल्या आश्रमांत संगोपन केलें. हा स्वारोचिष मन्वंतरांला ऋषि होता. भार्गवगोत्राच्या पांच प्रवरांपैकी और्व हा एक प्रवर आहे.

**औलिया** 'वली' चें बहुवचन. देवाच्या आवडत्या व्यक्ती. यांना कशाचीहि भीति नसते व दुःख कधीहि शिवत नाही, असें कुराणांत म्हटलें आहे ( १०. ६३ ).

**औशनस** सरस्वती नदीवरील प्रसिद्ध तीर्थ. यालाच कपालमोचन असेंहि म्हणतात. इथे उशना ऋषीने तप करून सिद्धि मिळविली. इथे कार्तिकेय व ब्रह्मादि देव उशना ऋषीचें प्रिय करण्यासाठी वास्तव्य करतात. इथे स्नान केल्याने सर्व पापें नष्ट होतात (म. भा. वन. ८३.१३५–३७).

**औशनस धर्मशास्त्र** उशनसाचें हें धर्मशास्त्र ५१ श्लोकांचें असून त्यांत सूत, मगध, चंडाल इ. मिश्रवर्णीय जाती आणि त्यांचे धंदे दिलेले आहेत. [हि. ध.]

**औशनस स्मृति** या स्मृतींत ९ अध्याय असून सुमारे ६०० श्लोक आहेत. त्यांत उपनयन, वेदाध्ययन, अनध्याय, श्राद्ध, वृत्तिविधान, अनुलोम-प्रतिलोम जाती इ. विषयांचा विचार केलेला आहे. [ हिंदुत्व; हि. ध. ]

**औषध** रोगनाशक द्रव्य. वाग्भटाने आपल्या ग्रंथाच्या सूत्रस्थानांत औषधाविषयीं पुढील श्लोक दिलेले आहेत–

**शोधनं शमनं चेति समासादौषधं द्विधा।**
**शरीरजानां दोषाणां क्रमेण परमौषधम् ।।**
**बस्तिर्विरेको वमनं तथा तैलं घृतं मधु ।**
**धीर्धैर्यात्मादिविज्ञानं मनोदोषौषधं परम् ।।**

अर्थ–शोधन (शरीरांतील मलद्रव्यें काढून टाकणें) व शमन असे औषधाचे दोन प्रकार आहेत. ( दोन्ही मिळून ) क्रमाने शरीरजन्य दोषांचे परम औषध बनतात. बस्ति, विरेचन, वमन त्याचप्रमाणे तेल, तूप, मध हीं शरीरदोषावरचीं; तसेच बुद्धि, धैर्य, आत्मादि विज्ञान हीं मानसिक दोषांवरचीं औषधें होत.

**औषधासाठी मुहूर्त**– मुहूर्तचिंतामणींत औषध तयार करणें, तें घेणें व सूचीकर्म ( सुई वगैरेंनी टोचणें ) यांसाठी पुढीलप्रमाणे मुहूर्त सांगितले आहेत––

**भैषज्यं सल्लघुमृदुचरे मूलभे द्व्यंगलग्ने**
**शुक्रेंद्विज्ये विदि च दिवसे चापि तेषां रवेश्च ।**
**शुद्धेरिःफद्युनमृतिगृहे सत्तिथौनोजनेर्थे–**
**सूचीकर्माप्यदितिवसुभे तक्षमैत्राद्विपुष्ये ।।**

अर्थ–लघु नक्षत्रें ( हस्त, अश्विनी, पुष्य, अभिजित् ), मृदुनक्षत्रें (मृगशीर्ष, रेवती, चित्रा, अनुराधा), चरनक्षत्रें (स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका) व मूळ या चौदा नक्षत्रांवर तसेंच द्विस्वभाव लग्न व त्यांत शुक्र, चंद्र, गुरु व बुध हे ग्रह असतां आणि याच चार ग्रहांच्या वारीं व रविवारीं नवीन औषध तयार करणें किंवा तें घेण्यास आरंभ करणें शुभ होय. या मुहूर्ताच्या वेळीं लग्नापासून सात, आठ व बारा हीं स्थानें शुद्ध अर्थात् ग्रहरहित असावीं. अमावास्या व रिक्ता या तिथी नसाव्या. जन्मनक्षत्रीं औषध घेण्यास आरंभ करूं नये. पुनर्वसु, धनिष्ठा, चित्रा, अनुराधा, अश्विनी व पुष्य हीं नक्षत्रें सूचिकर्मास शुभ होत.

**औषधात्मिका** एक शक्तिदेवता. [ पु. इं. ]

**औष्ट्रकर्णक** ल्हादिनीच्या तीरावरचें प्राचीन राज्य. [ पु. इं. ]

**औक्षण** उक्ष् = शिपडणें, या धातूवरून हा शब्द बनला आहे. सायणाने औक्ष म्हणजे प्रलेपन द्रव्य असा त्याचा अर्थ दिला आहे. महाराष्ट्रांत आरती, नीरांजन किंवा लामणदिवा ओवाळणें, यांसाठी हा शब्द वापरला जातो. मंगलप्रसंगीं ज्याचें मंगलकार्य व्हायचें असेल, त्याच्या तोंडाभोवतीं सुवासिनी स्त्रिया ताम्हनांत नीरांजन ठेवून आरती ओवाळतात. देवमूर्ती व राजे यांचेंहि उचित प्रसंगीं औक्षण करतात. हा एक आयुष्यवर्धक विधि आहे.

• •

